भाजीपाल्यात घालावयाच्या मसाल्यात उपयोग करितात [ म ] सामासशब्द– ०पत्र–न १ तमालवृक्षाचें पान याचा भाजी व त्याच्या मसाल्यात उपयोग करितात २ (उप) त्वारू [तमाल+पत्र] ०श्याम–वि तमालवृक्षासारखा काळा, सावळा (कृष्ण) 'तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा।'–ज्ञा १७ ३४ [तमाल+श्याम=सावळा]

**तमाश(स)गिरी**—स्त्री १ तमासगिराचा, खेळ करणाऱ्याचा धंदा तमाशाचा धंदा २ (व) गमतीचें दृश्य मौजेचा खेळ, गमत [तमासगीर]

**तमाशगी(गा)र, तमासगीर**—वि १ तमाशा पाहणारा, मजा, गमत पाहण्यास नेहमीं उत्सुक असलेला 'कठड्याचे बाहेर तमासगीर लोकास व्यवस्थेशीर उभें राहू द्यावें'–(बडोदें) पहिल वान लोक व कुस्त्यासबधीं नियम २४ २ (ल) प्रेक्षक, तिऱ्हाईत (गमत पाहणारा) माणूस, बघ्या ३ तमाशा करून उपजीविका करणारा तमाशेवाला (गारुडी, जादूगार, डोंबारी, विदूषक, बहुरूपी इ०) [अर तमाशा+गीर प्रत्यय]

**तमाशा–सा**—पु १ सोंगें घेणें, बाहुल्या नाचविणें, दोरावर चालणें इ० सारखे विदूषक, बहुरूपी, गारोडी, डोंबारी इ० काचे करमणुकीचा खेळ २ गमत, मजेदार दृश्य आनददायी प्रसग 'ध उपदशा कोण तमाशा, गमत महेशा।'–मक्क २ शिवरामकृत रामजन्म ३ 'पाहती सकळ लोक तमासा।'–आशिवि ३३ ३ तडायुद्ध, लटकी लढाई कुस्ती 'अरे बघुकी, जेठ्याचा तमाशा पहावयाची वासना आहे'–लक्ष्मीनारायण कल्याण नाटक (शके १८०४) (ग्रथमाला) ४ चमत्कार, आश्चर्यकारक गोष्ट 'म्हणे अधरा भारा कैसा। चालतो हा न कळे तमासा।'–नव १२ ५४ ५ पराक्रम 'किल्ला घेतला तमाशानें।'–ऐपो ७३ ६ (सामा) (उप) खेळ, फजिती 'काय आमच्या दैवानें आमचा तमाशा माडला आहे'–स्व ८९ ७ लाज सोडून स्वैरपणानें केलेली चटा, वर्तन [अर तमाशा] ०ग्या मनुष्य–पु तऱ्हेवाईक लहरी, विचित्र मनुष्य

**तमामूस**—पु १ (एखाद्यास लिहून दिलेला) करार दस्तऐवज, लेख २ स्वत ची सही, शिक्का, स्वदस्तुर असा जुनीचा अर्थ रूढ आहे [अर तमस्सुक]

**तमिष्ट**—वि (व) तामसी, रागीट, क्रोधिष्ट [त्म]

**तमिस्रा**—स्त्री अधारी रात्र [स]

**तमी**—स्त्री रात्र [स तमस्=अधार]

**तमीज**—स्त्री १ पद्धतशीरपणा, व्यवस्थितपणा, नीटनेटकपणा २ विवक जाणीव बुद्धि ३ अदब [अर तमीज्=विवेक, ज्ञान, बुद्धि]

**तमोगुण**—पु मूनमानात अगणाऱ्या त्रिगुणापैकीं अधोगामी असा तिसरा गुण यापासून अज्ञान, मूढत्व, कामक्रोधादिक विकार उत्पन्न होतात तम पहा [स तमस्+गुण] **तमोगुणी**–वि १ तमोगुण ज्यात आहे तें २ तामसी, शीघ्रकोपी [तमोगुण]

**तमोहर**—पु सूर्य, तमारि [स तमस्=अधार+हर=नाहीसा करणारा]

**तय**—स्त्री १ पूड, चूर्ण २ मसालामिश्रित मास 'पुढा त्याचें चौथें साधन तय म्हणजे मसालामिश्रित मास'–गृहि २ १३८

**तय**—स्त्री (गो) तृतीया, तीज [स त्रय, प्रा तय]

**तय**—क्रिवि (मव्री) निश्चित नक्की

**तयनात, तयनातजाब्ता, तयनाती**—तैनात इ० पहा

**तया**—सना १ (काव्य.) त्याला 'तया गज तो वाद्महा पशु। कवि टाक।'–कृ० 'धन्ला पराभव कसा, जा मृत्यु जयी तया हि, शातनवा।'–मोकर्ण ५ ३ २ तिनें 'तय प्रत्युत्तरें बोली। श्रीकृष्णें जे चावलिली। तया व्यक्ती जाली। अष्टदशा।'–ज्ञा १८ ७४ ३ 'त्या'चें कवितेंतील रूप 'तया शोकें धायाळ हृदय होता।'–र ११ यालाच ला, चा, नें इ० प्रत्यय लावतात उदा० तयाला=त्याला, तयाचा=त्याचा. 'तयाचा हा शौरी नियतच अहो होय विकल।'–सारह ८ १७६

**तया(य्या)र**—वि १ परिपूर्ण झालेला, केलेला, बनविलेला, ज्याचा काहीं एक अश करावयाचा राहिला नाहीं असा (नियम, गोष्ट इ०) २ (कोठें जाण्यास, एखादें कार्य करण्यास) उद्युक्त, सिद्ध सज्ज, उत्सुक ३ (व) सशक्त, लठ्ठ, धष्टपुष्ट [फा तय्यार] **तयारणें**–सक्रि (काव्य) तयार, सज्ज ठेवणें करणें जामदारखान्यात खजिना द्रव्याच्या पेट्या भरल्या। दार सलीत सहीत कतरा त्या उठाच्या तयारल्या।'–हाला १५१ [तयार] **तयारी**–स्त्री १ तयार सज्ज होण्याचा व्यापार क्रिया तजवीज २ बेगमी तयार होण्यास, सिद्धीस लागणारे जिनस, सामुग्री, साहित्य ३ (माणसाची एखाद्या गोष्टीची) सिद्धता सज्जता (एखादें कार्य करण्याबद्दलची मनुष्याची) खुशी ४ (संगीत) उपस्थिति (एखाद्या गोष्टीच्या व्यासगानें येणारें) कौशल्य, कसब 'त्या गवयाची तयारी चागली आहे [फा तय्यारी]

**तयारी**—स्त्री एक्खादी माळ्या राहुरींचें प्रवेशद्वार ०च्या मेखा–स्त्री अव तबू उभारण्याची तयारी करताना ठोकतात त्या सहा मेखा खुण्या

**तयीं**—क्रिवि (काव्य) त्यावेळीं, तेव्हा तई 'तयीं प्रभु वरा। तम सदय का असें आज हो।'–केका ८१ [स तदा] **तयीं(यिं)हूनि**–क्रिवि (काव्य) तव्हापासून 'तयिंहूनि कम ळाची प्रीति उत्पन्न झाली।'–मारुह २ २९

**तये**—१ ( कवि ) त्या 'तये सगतीनी जर्नी योण गोडी।' —राम ४५ २ तिरा 'काय स्त्री बोलनी तये बोलती ?।' —रामदासी २ ७२ [ती, तया]

**तर**—स्त्री १ (दे० कु ) होडी, मचवा तरी पहा २ (मचवा इ०कार्ने उतरून जाता येईल अशी ) ग्याडी ३ (नाविक कु ) खाडींतील होडया लावण्याची किना यावरील सोईस्कर जागा, ठिकाण ४ पलीकडील बाजू, तीर 'अर बाधें तर बाधें।' —वैद्यक ७६ [स तृ-तरणें ] (वाप्र ) **तरीपार करणें**—सरि खाडीवरून, समुद्रातून होडी इ० नीं पलीकडे नेणें, पोहोंचविणें

**तर**—स्त्री मर्यादा हद्द [तीर] ०**पार करणें**—हद्दपार करणें

**तर**—विशेषणास लागणारा तारतम्यवाचक तद्धित प्रत्यय उदा० गुरु=मोठा गुरुतर=अधिक मोठा प्रियतर, इतर [ स ]

**तर**—वि ओलें तानें, रसपूर्ण 'तर मेव्याच व खुरक मेव्याच स्रोन '—रा १० २९६ [फा तर्]

**तर**—उभ जर या उभयान्वयी अव्ययाचें उत्तरगामी उभयान्वयी अव्यय याचा अर्थ तसें झाल्यास असल्यास, त्याअर्थी इ०, बन्याच वेळा तर ह्या शब्दाचा वाक्यपूरक म्हणून उपयोग करितात अशा वेळीं त्या वाक्यात काहीं विशेष अर्थ व जोर यतो जसें—हो ! आता मी जातों तर=मी सर्वथा जाणार नाहीं विरुद्धक बळा तर हा शब्द त्यानें जोडलेल्या दोन वाक्याच्या अर्थाचा विरोध दाखवितो उदा० तुम्ही तर लाख रुपये मागता व मी तर केवळ गरीब पडलों यानें सदिग्धता अनिश्चयहि दाखविला जातो उदा० मी तें नाटक पाहण्यास आलों तर खरें ' ' मध्यें तर दिसतें आहे, ' 'मध्ये तर आणू नका लावू नका ' या वाक्यातहि सापक्षता, यदृच्छाघटित साकल्पिकत्व निर्दिष्ट आहे परतु पहा [स तर्हि]

**तरई**—स्त्री १ गुन्हाळात देखाळीं ठेवण्याकरितां केलेला गोलडी वाकडा पत्रा —ज्ञाको ऊ १८ २ कोष्टयाचें वस्त्र गुडा ळण्याचें लाकूड [स तरी]

**तरक**—स्त्रीपु १ (छपराच्या कोपऱ्याला लाकडी भिन्याच्या बाजूस भिंतीला धारण इ०कास ) आधार म्हणून दिलेला खाब, तुळई २ (खाणी मोरवा म्हणून झाड इ०कास लावलेला ) लाकडाचा भक्कम तुकडा धीरा [फा हिं ]

**तरकट**—न १ ( एखाद्यावर खोटा आळ घेण्याकरितां रच लेलें ) कुभाड कुलंगडें, लचाड, किटाळ ( क्रि० घणें, सागणें ) २ वेडावाकडा तर्क कल्पना तर्कट पहा [स तर्क]

**तरकट तरकटी-ट्या, तरकटबाज**—वि कुभाडखोर, कड्या पिकविणारा, तरकट रचणारा वाल्टखोर

**तरकणें**—सक्रि तर्कानें जाणणें ताडणें अदाज अनुमान करणें 'गुणेन शाद्धुवर्म तरकती।' —ऐपो २२३ 'त्याचे डाळ लाल पाहताच यानें दारू खाटी आहे असें मीं तरकलें ' [ तर्क ]

**तरकणें**—अक्रि तडकणें फाटणें तरकणें पहा 'पाहे पा अत्यन्त झाल। दिसे नवां ठायीं तरकेलें।' —एरुस १७१४ २ फुटणें भेगळणें 'शीतें ओंठ तरकती।' —दा ३ ७ २२ [टर कणें, तडकणें, तुल० फ तराक=फाटण्या-मोडण्याचा आवाज]

**तरकश-स, तकश**—स्त्रीपु १ बाणांचा भाता 'मुगुट मनोहर कवच धनुर्धर। तरकसी बाचन बाण।' —मध्व ५० २ (सामा ) शस्त्र इ०काचें वेष्टन, टोपण, म्यान, कोश [फा तर्कश्, तीर्कश् तुल० गुज तरकस] सामासिक—**०कमान**—स्त्री भाता आणि धनुष्य 'यक बंदूक व येक तरकस कमान दे त्याग पाठविले '—पद ३ १२३ [ तरकस+कमान ] **०खात तीर**—एक हत्यार —वाडबाबा ३ १६७

**तरकाकडी**—स्त्री एक प्रकारची उन्हाळी भोंगी व लाव काकडी, (विरू ) टरकाकडी पहा [फा तर=ओलें+काकडी]

**तरकाफरकी**—क्रिवि तडकाफडकी पहा

**तरकारी**—स्त्री भाजी [ हिं ]

**तरक्की**—स्त्री अभिवृद्धि, भरभराट, वढती, उत्कर्ष 'राव साहेबाच दौलतची रोज ब रोज तरक्की होत, हे गोष्ट त्यास खुश लागत नाहीं '—रा १ ५२ —वाडबोमा २९४ [ फा तरक्की]

**तरकीब**—स्त्री युक्ति, उपाय योजना, चतुराई 'येऊनि बैसले मत्रीमडळीं। भक्ति चतुराई येकवटली। वरी तरकीब राजाची।' —दावि ३६६ [अर तर्कीब्]

**तरकीम**—स्त्री लेखन 'त्यास साहेबाच काय सल्ला त फम विली पाहिजे, म्हणोन तरकीम केले '—रा ३ ७३ [अर तर्कीम्]

**तरकूट**—न ( राजा ) ताडूळ, पोहे इ०काच्या ठिकाणीं असलेला रव्याचा चरचरीत अश मरडा, बण्या कुट [फा तर्+कूट]

**तरग**—पु १ पाण्याची लाट, लहर खळबळ ऊर्मि 'पैं आगानि गलिया सागर। मग तरग ना नीर।' —ज्ञा १४ ५०६ 'उदकावरील तरग। तरग उदकाचें अग।' —तुगा ३०६९ २ (ल ) अनियन्त्रितपणानें मनात एकामागून एक उद्भवणाऱ्या विचारांपैकीं प्रत्येक क्षणिक विचार नवी कल्पना लहर ३ पाण्यावर येणारा तेल इ०काचा तवग थोडासा डाग ४ दृष्टि अस्पष्ट करणारा डोळ्यावर यणारा साका, पटल ५ जलतरग पहा ६ बुडबुडा फुगा [स ]

**तरग**—नपु १ (गो कु ) दवळातील देवतेच्या चिन्हाचा खाब गुढी २ अगात देव सचारणाऱ्यानें हातात घ्यावयाची काठी, धार्मिक समारभातील एक उपकरण हे गुढीसारखें असून त्यावर देवाची चिन्हें काढलेलीं असतात कांहीं सणात याच्या शेंड्यास वरीच लुगडीं नेसवून ती नाचवितात नाचविल्यावर अवसर यतो तरग घेण्याचा मान ठराविक कुटुंबाकडे असतो 'आम्ही गावकर

लोकांनीं गरज पाडल्यानीं दयीपुढें तरंग उभे राहतें रग पहा ।' —मराठी ९२

**तरंगण**—स्त्री (गजा) रंगीत गाडी पाहून अव्यवस्थित पणें वसणें, फत्कड (क्रि० मारून बसणें) [सं तृ, स्तृ]

**तरंगणें**—अक्रि १ पाण्यात न बुडता फक्त पृष्ठभागावर राहणें, तरणें, तिरणें, पोहणें 'तरंगातो लागे बुद्धी। विवरणवरी' —ज्ञा ११.२२१ २ (ल) वहकणें, (बोलताना) वहावत जाणें, मुद्दा सोडून भलतेंच बोलणें ३ (एखादा खटला, वाद इ०) निकाल न लागता भिजत लोंबकळत, पुढें बत पडणें ४ (मन इ०) गैरयान, संदिग्ध स्थितींत असणें ५ भानावणें, धुंदित होणें, थारणें, धवकणें ६ (एखाद्या व्यक्तीचा, गोष्टीची) अपेक्षा धरून खाळंबून राहणें, चित्र बसणें, मार्गप्रतीक्षा करीत धावणें 'ज्याप्रमाणें वषट्काराचा घोष चालून इंद्रादि देवता सोमपानाविषयीं तरंगल्या असता '—नि ४१६ 'तुमच्या सारी ही सर्व मंडळी तरंगती ' [तरंग] **०तरंगायास लावणें**—(त्यांचें काम इ०) निकालात न काढता लोंबकळत ठेवणें, संदिग्ध स्थितींत पाडणें **तरंगविणें**—सक्रि. १ तटकळत, खोळंबून ठेवणें २ (कार्य इ०) लोंबकळत, भिजत ठेवणें. [तरंगणें]

**तरंगिणी**—स्त्री नदी [सं]

**तरच**—उअ १ म्हणूनच, करिताच, तसें आहे म्हणून (कार्यकारणाचा साक्षात्कार झाल्यानंतर दोन गोष्टींतील परस्पर कार्यकारणभाव मनास पटतो त्या अर्थाचें द्योतक उभयान्वयी अव्यय) 'तूं इतका दुष्ट आहेस ना? तरच ईश्वरानें तुला भिकारी ठेविलें आहे ' २ (अमुक एक अमुक गोष्ट) निश्चित, कबूल, नक्की असेल तर तसेंच झाल्यास 'माझें सगय हातावर पडलें तरच नाहीं ' [तर+च(दाब)]

**तरंग**—स्त्री १ पाण्यावरील (तरंग इ०काचा) तरंग, लवग, पातळ थर तरंग अर्थ ३ पहा २ डोळ्यातील मळ इ०काचा पातळ पापुद्रा पटल, भुरी, सफ तरंग अर्थ ४ पहा

**तरज(जु)मा तर्जुमा**—पु १ भाषांतर दुसऱ्या भाषेत अनुवाद २ (मजकूर इ०काचा) सारांश मतलब गोषवारा गाळावरीज ३ सालातील उत्पन्न खर्च व शिल्लक याचा एक ठिकाणीं नोंद, राज्याचें एकंदर उत्पन्न किती व खर्च किती व पैन किती आणि खडण्या किती यावयाच्या इ० सव प्रकारची एका कागदावर दिलेली माहिती ताळेबंद हा एकदरनी तयार करतात —इनाम ५१ [अर तर्जमा तर्जुमा]

**तरजुमान तर्जुमान**—पु १ भाषांतराच्या कामावर नेमलेला सरकारी अधिकारी भाषांतऱ्या २ दुभाषी, दुभाष्या [अर तर्जुमान]

**तरंड**—पु १ पल्लें २ तरण्यासाठीं केलेला लाकडाचा तराफा [सं]

**तरंडक**—पु होडी, तरंड अर्थ २ पहा 'अनन्य प्रभु दुर्गत दारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक हो ।' —मोवन ४ १२ [तरंड]

**तरडा**—वि. १ शुष्क, रसहीन, जून (भाजी, मिरची, तोंडले, भाजीपाला इ०) २ पुष्कळदा हा शब्द वय, शुष्कपणा, जूनपणा, चिवटपणा इ० दर्शक विशेषणापुढें अथवा मागें जोडून आधिक्य दाखविण्यात येतें उदा० जून जून तरडा=अतिशय जून रसशून्य

**तरडी**—स्त्री एक वनस्पति हिच्या दोन जाती असून हिला फळें व फुलें येतात

**तरण**—न १ तरणें तरंगणें, तरून जाणें —ज्ञे १४३ कहीं याचानि शिडा वातुबळें जैंवि सागरीं तरण।' —मार्कं २६ ८ २ होडी, तराफा, तरण्याचें साधन [सं]

**तरण**—न तादुळाच्या कण्या, डाळ इ० पुष्कळ पाण्यात शिजवून व त्यात तिखट, मीठ मसाला घालून केलेलें पातळ खाद्य कांजी, कण्या 'कन्हिया पातळ तरण।कुडुबरमण करीतसे।' म्ह० नवरा रडतो तरणास आणि वऱ्हाडी रडतात वरणास=नवे अवयाम सुद्धा तरणमात्रें रडावें लागतें तेथें वऱ्हाडी मंडळींना वरण कोठून मिळणार? मुख्य माणसाची सुद्धा जेथें बरदास्त नाहीं तेथें इतरांस कोण विचारतो! (तुल) जावई रडे अळणास आणि व्याही रडे कळणास

**तरणा**—वि १ तरुण, जवान २ मूल व मोठा माणूस याच्यामधील वयाचा, अप्रौढ, वाप्या पान्या [सं तरुण] म्ह० म्हाताऱ्यानें केलें नाव तरण्यानें वाहविलें गाव=कर्तृत्ववान धन्याची प्रजा कधीं कधीं नादान निघते या अर्थीं अनुभूत हीं म्हण आहे तरणा पाउस पहा सामासादि— **०ताठा**—वि भर ज्वानींत असलेला, चागला धाकटा तरुण व सशक्त तरणाबांड (मनुष्य) [तरणा+ताठ] **०पाऊस**—पु (नक्षत्र्यात रूढ) आर्द्रा नक्षत्र चें पुष्य त्याचा पाऊस याच्या उलट म्हाताग म्हणजे पुनर्वसु नक्षत्राचा पाऊस **०बांड**—वि जामदार व धाकटा तरुण (पुरुष) [तरुण]

**तरणि-णी**—पु सूर्य तिया भजपासीं चिद्रत्नाचिया खाणा। परी उपजलिया पाल हातिया तरणी। तुचतोण झणा।' —ज्ञा १० १६२ करून प्रातस्नान अगोदर वटुनीया तरणी।' —प्रला ११८ [सं]

**तरणि-णी**—स्त्री नाव, होडी तराफा नौका तरण पहा [सं]

**तरणी**—वि तरुणी युवती नवीतरुणी असा शब्द रूढ 'वीं कामविकरानीं काळविली कामिनी नवी तरुणी।' —माभीष्म ७ ३० [सं तरुणी] **०ताठी**—वि तरुण व सशक्त (स्त्री)

**तरणूक**—स्त्री (तरून जाणें) पाडचणींतून, संकटांतून निभावून जाणें, वर डोकें काढणें, सुटका [तरणें]

**तरणें**—अक्रि १ (पाण्यावर) तरंगणें, पोहणें २ –उक्रि नदीपार जाणें, पैलतीर गाठणें 'का थाहीं तरता बळमा। दाटला जेथीं।' –ज्ञा ११ १८६ ३ (ल) संकट, प्रपंच इ० वांतून निभावून जाणें, मुक्तरूप पार पडणें, मुक्त होणें 'ह्मणौनि गुरु घर कम्निदि मान्हें त्या सुटोनि न वन तरे।' –मोउद्योग १३ १८० ४ मोक्ष मिळणें, संसारसागर पार होणें, ईश्वरप्राप्ति होणें [स तरण] **तरणोपाय**–पु १ संकटांतून निभावून जाण्याचा उपाय, इलाज बचाव २ धडगत, गत्यंतर, सद्‌गति [स तरण+उपाय]

**तरत**—पु वेदुक 'जसीं तरत अपूर्व तसेचि म्हणोनि पराविरि सर्व तने।' –आसेतु १८

**तरतम**—न १ (दोन वस्तूंतील) सरसनीरसता, श्रेष्ठ कनिष्ठपणा, उच्चनीचपणा २ सारासार विचारशक्ति विवचक बुद्धि तारतम्य (क्रि० राखणें, पाहणें, ठेवणें) ३ (दोन वस्तूंतील) सरसनीरसता ठरविण्याची क्रिया [स तर+तम] सामाशब्द– **०भाव**–पु (दोन वस्तूंत ठरविलेला, दिसणारा) उच्चनीचभाव सरसनीरसता, श्रेष्ठकनिष्ठता ठरविणें, तारतम्य (क्रि० करणें, ठवणें राखणें मानणें)

**तरतर-रां**—क्रिवि १ चपळाईनें व वेगानें, तुरतुर (विंचू, कोळी, मुंग्या इ० चालणें), दुडदुड-डुडा (मूल, तट्टू इ० चालणें) २ (सामा) जलद, चपळतेनें [ध्व तर् द्वि] म्ह० राउत असे खरमरा तर घोडा चाले तरतरा=काम करून घेणारा खरमरीत असल्यास काम करणारा (गडी) चपळाईनें काम करतो

**तरतरणें**—अक्रि (गो) नावाजणें, प्रसिद्धि पावणें, गाजणें

**तरतरणें**—अक्रि १ (जमीन, चुन्याची कळी, हरभरे इ० भिजल्यामुळें) फुगणें (तळलेले पदार्थ झाडें, पानें इ०) फुलणें, फुगणें फुगून टवटवीत होणें, (फोड गळू इ०) सुजणें, टापसणें, तटणें 'सारलेल्या शरिरावरती। गोविंद होउनि तरतरतातीं।' –अमृत १० २ (ल) (आनंदातिशयानें) प्रफुल्लित होणें खुलणें ३ (ल) (संपत्ति ऐश्वर्य इ० कानीं) भरभराटणें, तर्जीस चढणें [तरतर]

**तरतणें**—अक्रि (एखाद्या गोष्टीविषयीं) आतुर उत्सुक, उत्कंठित होणें [स त्वर् प्रा तर]

**तरतरणें**—अक्रि (माण) (विंचू मुंगळ इ० कानीं) तुरतुर चालणें धावणें [तरतर]

**तरतरा**—पु पैलू पाडलेला हिरा

**तरतरा**—क्रिवि (गो) हरतऱ्हा नाना तऱ्हांनीं [तऱ्हा द्वि]

**तरतरा**—स्त्री १ (पाण्यांतील हालचालींतील) चपळाई चपळता त्वरा चटपट २ (एखाद्या कार्यांतील बोलण्यांतील) १ चलाखी, हुशारी, जोम, उत्साह मार्मिकता चुणचुणीतपणा ३ (चेहरा, झाड, इ० कांवरील) टवटवीतपणा, प्रफुल्लता, तुकतुकी ४ (बुद्धि, धाडाणपण इ० कांची) चपलता, चलाखी, समयज्ञता ५ हजीरजबाबीपणा समयसूचकता [तरतर]

**तरतरीत**—वि १ चलाख चपळ, हुषार चुणचुणीत २ ताजा, तरतरीत (नाक इ०) ३ रोंखलेला, टवकारलेला, उभा केलेला, उभारलेला (जनावराचा कान इ०) ४ नीट, सरळ, ताठ (शरीर झाड इ०) ५ (सामा) उभा या शब्दासह आधिक्य दर्शविण्याकरिता योजतात जसें तरतरीत उभा=अगदीं सरळ, ताठ [तरतरी]

**तरट**—न (घोड्याचा) मोठा चाबूक, असूड 'जैसा वारु उपराणी। वश्य करी अश्वसाहणी। मागें तरटाचा मर पणाणी।' –एभा २० २१६ 'तरटापुढें बरें नाच। सुतें काचें मुगळ।' –तुगा ३००३ [फा 'तरट तु महावक्षा।' –राज्य ७ २७]

**तरट**—न गोणपाट पोतें

**तरट**—न एक फळ 'मग नेपथीं तरटें तोडोनि त्वरित। कातसह बैसले सात।' –भवि ५६ ९२

**तरटी**—स्त्री १ गोणपाटाचें पोतें, थैला २ ओझ्याच्या गड्याला, बैल इ०कांवरून न्यावयाच्या बुचल्याला गुंडाळावयाचा तरटाचा मोठा तुकडा, तरटें –वि गोणपाटाचें केलेलें, तरटाचें [तरट]

**तरटा-टें**—स्त्रीन १ (तिरस्कारार्थी) डोकें, मस्तक, थोडके टाळकें नारळाचा करटी [का तरट]

**तरटी**—स्त्री खरबुजाची एक जात हिचा आतील रंग हिरवा असतो –कृषि ७५२ खानदेशांत हिला जाम असें म्हणतात

**त(र)टी**—स्त्री एक वृक्षविशेष

**तरटें** न गोणपाटाचा मोठा तुकडा तरटी अर्थ २ पहा

**तर्टें**—न १ डोकें टाळकें, बोडकें तरटी–टें अर्थ १ पहा २ (राजा) टक्कल [फा तरट] **०ग्या**–वि टकल्या

**तरड, डा-डें-तर्डें तरड(ढ)क**—नपु १ ओलवून दळलेल्या गव्हाचा कोंडा, तराग २ (ल) चव्हाट पाल्हाळ लावल्यक व कंटाळवाणें भाषण (क्रि० लागणें, लावणें माडणें) **तरडीं पेटणें–लावणें**–रागावणें, क्रोधाविष्ट होणें

**तरता**—वि १ तरणारा, तरंगणारा २ (ल) बुडण्याची भीति नसलेला, किफायतशीर, फायदेशीर (धंदा, व्यवहार इ०) ३ चालत्या ठिकाणीं गुंतविलेला, न बुडणारा (पैसा) ४ वसूल देण्यासारखा, न बुडविणारा (ऋणको) [स तॄ=तरणें] **०पंथ**–पु सुरक्षित मार्ग सुटकेचा सरणाचा बचावाचा मार्ग उपाय

**तरत्या पंथास लागणें**-(एखादा संकटग्रस्त, आजारी माणसानें जिवावर बेतलेल्या संकटातून, आजारातून) पार पडण्याची, निभावण्याची, बचावण्याची चिन्हें व्यक्त करणें, आजारातून उठणें, धाणेंस दिवस येऊं लागणें ०**बुडता**-वि १ भरभराटीस आलेला किंवा डबघाईस आलेला (व्यापारी इ०) २ फायदेशीर किंवा आतबट्याचा (धंदा, व्यवहार, रोजगार, काम, प्रकार, माल इ०) [तरणें+बुडणें] -**तें बुडतें पाहणें**-(एखाद्या धंद्यातील, व्यवहारातील, सट्ट्यांतील) नफानुकसान विचारात घेणें, धन्यापाईंट परिणामाचा, उलटसुलट बाजूंचा विचार करणें -**ती घाडी**-स्त्री. नेहमीं (होडी इ० नीं) ओलांडतां येणारी खाडी **तरतें**-वि (तरणारें) वसूल होण्यासारखें, कर्ज न बुडविणारें धराज (कूळ इ०) तरता पहा ०**कूळ**-न कर्ज दिलें असतां बुडविणार नाहीं असें कूळ, खात्रीचें कूळ ०**बंदर**-न १ ज्यांत पाणी भरपूर असल्यानें गलबतें, होडया इ० नेहमीं तरूं शकतात असें बंदर २ ज्यात किनाऱ्यापर्यंत जहाज जाऊं शकेल असें बंदर ०**बुडतें**-न लाभहानि, नफातोटा -वि तरता बुडता पहा

**तरतीब**—स्त्री १ व्यवस्था, योजना, युक्ति, तयारी; तजवीज २ (एखाद्या कामाची) निगा, काळजी, काटकसर ३ (एखाद्याची) बरदास्त (क्रि० ठेवणें, राखणें, संभाळणें, धरणें; पाहणें) [अर तर्तीब्]

**तरतु(दु)द**—स्त्री १ (एखाद्या कार्याविषयींची) साधनें इ०ची तयारी, सिद्धता, जुळवाजुळव, तजवीज, बंदोबस्त (क्रि० करणें) २ (मनुष्याची, जनावराची) निगा, बरदास्त, काळजीपूर्वक व्यवस्था, हवें नको पाहणें, मोर्यांचा विचार करणें (क्रि० करणें पाहणें, राखणें, ठेवणें) 'बाबाच्या मर्जीप्रमाणें तरतूद ठेवून त्यांची सेवाचाकरी करावी बरें' -कमं १ ४५ [अर तरद्दुद्]

**तरदणें**—अक्रि (वे) खरचटणें, घासटणें

**तरफ, तर्फ**—स्त्री १ दिशा, बाजू, कड २ (भांडण, कज्जा इ०तील) पक्ष, बाजू, कड 'त्याच्या तरफेचें भाषण हा बोलतो' ३ ताबा, जिम्मा, राखण, निसबत 'हा दागिना तुमच्या तर्फेस असू द्या' ४ हुकमत, अमल, ताबा 'तुमच्या तरफेच्या स्वारांची हजिरी घ्यावयाची आहे' ५ देशाचा एक लहान भाग, कांहीं विशिष्ट संख्याक गावांचा गट, महाल अशा कांहीं तरफा मिळून परगणा होतो देश पहा 'मराठेशाहींत साठ गावें मिळून तरफ' -गागा ४२ महालाचा संबंध दाखवावयाचा असल्यास गावामागें हा शब्द योजतात उदा० मौजे ओण, तरफ राजापूर ६ तरफबंदी-पद्धतीखालील जमीनींचा एक वर्ग [अर तर्फ्, तरफ्] सामासशब्द- ०**दार**-पु १ तरफेंत असलेल्या गावांचा वसूल करणारा, त्यावर हुकमत चालविणारा अधिकारी, महालकरी हा मामलतदारांच्या हाताखालीं असतो -वाडमा १ ३ २ शको ४. १० २ तरफ म्हणून जो जमीनीचा विशिष्ट विभाग तिचा मालक -वि. पक्षपाती, कैवारी. दोस्त [तरफ+दार] ०**दारी**-स्त्री पक्षपात, कैवार, एखादी बाजू सावरून धरणें, वगैरे [तरफदार] ०**बंदी**-स्त्री १ जमीनमहसुलाची एक पद्धत हींत गावांतील जमीनींचे मोठेमोठे भाग पाडून एक एक भाग गावांतील एकेका कुटुंबास स्वतंत्रपणें लागवड करण्यास दिलेला असतो यात कुटुंबातील वाढण्या येत नसून सबंध कुटुंबाकडील जमीनीच्या सान्याला तें एक कुटुंब जबाबदार धरलें जातें याच्या उलट कासबंदी पहा २ दोन्ही बाजूंनीं बांध, कुंपण घातलेला [तरफ+बंदी] ०**सानी**-पु दुसरा पक्ष, प्रतिपक्ष 'बट-अहदीची दर्यापत्त होय. शरिकानीं दोन तरफ-सानीकडे नगीदन-पूर्वक सांगून पाठवावें' -रा ७ : [फा तर्फि सानी=दुसरा पक्ष]

**तरफ**—स्त्री. वाद्याची तार. सारंगी, सतार इ० वाद्यास स्वर भरण्यासाठीं मुख्य ताराच्या खालच्या बाजूस लाविलेली तार

**तरफ**—स्त्री १ (पदार्थ) जड पदार्थ उचलण्यासाठीं, हलविण्यासाठीं त्याच्या खालीं पहार इ० सारखा घातलेला दांडा, उच्चालक, उत्तोलनदंड; (इं) लिव्हर् २ दार बंद करण्याकरितां दाराच्या फळ्यामागें घातलेला, गाडीच्या चाकाच्या गतीस प्रतिबंध करण्यासाठीं घातलेला अडसर, अवरोधक [हिं तरक=तुळई, वासा ?]

**तरफरा (तफरका ?)**—वि. गहाळ, अफरातफर झालेला 'याचा माल कांहीं तफरका जाहला असेल तो याचा यास देणें' -वाडबाबा २ १४१ तफरका पहा

**तरफड-डा, तरफडणें, तरफडाट**—तडफड इ० पहा

**तरफडा**—पु (ना) धडपड, तिरपीट; धांदल तडफड पहा [तडफड]

**तरवणें**—सक्रि (वे) धावविणें [फा तरद्=धावणें]

**तरबूज**—न टरबूज पहा [फा]

**तरबेज-त-द**—वि कुशल, वाकबगार, निष्णात, प्रवीण निपुण [अर तर्बियत्]

**तरम**—पु (मोजणी) जमीनींची प्रतवारी ठरविणारा अधिकारी -स्त्री जमीनीची प्रत, दर्जा, जमिनीचा सारा, आकार सारा आकारणी 'तरम ठरवणाऱ्या मोजणीकारकुनाची गाठ कऱ्यांनीं सरबराई न केल्यामुळें त्यानें चिडून जाऊन जिराईत जमीनीस बागाइताचा आकार लावून' -खेया ३६. [अर तरह म तऱ्हा, ते तरमु, ता तेरिम] ०**बंदी**-स्त्री मोजणीवरून ठरविलेली जमीनींची वर्गवारी, प्रतवारी. [तरम+बंदी]

**तरम-मा**—नपु (राजा कु) होडी समुद्रात ढकलतांना समुद्रातून किनाऱ्यावर काढतांना उपयोगांत आणावयाच्या लाकडी तुकड्या-वाश्यांपैकीं एक

**तरमळ, तरमळणें**—तळमळ, तळमळणें इ० पहा

**तरमुंडी-ड**—स्त्री गर्दीतून बाहेर पडण्यासाठीं, गर्दीत घुसण्यासाठीं डोकें पुढें करून सर्व शरीरासह जोरानें केलेला प्रवेश; गमन, तुटून पडणें, मुसंडी (क्रि० देणें) 'भीष्म म्हणे भीम धरा याचि तुम्ही सर्व वीर तरमुंडी।' —मोभीष्म ५ ४३ 'शिरतिनिति पराण याच्या' मुंडी देऊन तरमुंडी झाले सवळेचि शिपाई लढी।'—राला १०४ [ हिं तर=खालीं+मुंडी=डोकें ? ]

**तरमूळपणें**—अ. पूर्ण लक्ष्य न देता -शार

**तरल**—वि १ हलणारें, कापणारें व पावणारें २ अस्थिर चचल, क्षणिक ३ द्रव पातळ [ स ]

**तरवटणें**—अक्रि तारवटणें पहा

**तरवटा, तरोटा**—पु एक औषधी वनस्पति याला, टहा टळ, टाकळा, टाकळा असेंहि म्हणतात

**तरवड**—पु एक वनस्पति याच्या जातींत बऱ्याच वनस्पती, झाडझुडें याचा समावेश होतो याचीं फुलें सुंदर असतात व त्यांचा उपयोग औषधी कामाकरिता व कातडीं रंगविण्याकडे केला जातो —ज्ञाको —ते २४ [प्रा तरव'] **तरवडी**—वि तरवडापासून काढलेल्या रंगानें रंगविलेलें (कातडें)

**तरवणी**—न आजारास यावयाचें-शिजविलेली डाळ व तांदूळ यांचें पाणी, पेज, कांजी [ तरण+पाणी तरत् पानीय-तरावणीअ-तरावणी-तरवणी —भाअ १८३४ ]

**तरवणें**—अक्रि १ अतिशय उत्सुक, उत्कंठित होणें २ आनंदभरित होणें [ स त्वरा, प्रा त्वरा ]

**तरवा**—पु (राजा हल कु ) १ रोप फुलझाडें, फळझाडें, धान्यें भाजीपाला इ०चा दुसरीकडे लावण्यास काढलेला रोपांचा पुंजका २ रोप टाकण्याकरिता तयार करून वाफा, जमीन, फुलझाडें फळझाडें, भाजीपाला लावण्याकरिता भाजून तयार केलेल्या जमीनीचा तुकडा कवल पोढून तरवा करावयास आा ३ ' —मसाप २ २ १७९ ३ भाताचें रोप तयार करण्याची जागा —शे १ [स तरु हिं तरव=झाड ? ]

**तरवा**—पु छत —वदलापूर ३५

**तर(ल)वार**—स्त्री युद्धोपयोगी एक शस्त्र समशेर, खड्ग मोठी कट्यार हें शस्त्र धातूचें केलेलें असून दोन किंवा अडीच फूट लांब असतें याच्या एका अगर दोन्ही बाजूस धार असते तरवारीच्या अ‍ेमान जवाहीर, तेगा धोप निमचा, पट्टा सडक, सैफ इ० जाती आहेत मर्दानें हो राज्य राखिलें मनसुबीची तरवार।' [ स तरवारि ] (वाप्र ) **०उपसून येणें**—चालून येणें, युद्धास, भांडणास सिद्ध होणें **०गाजविणें-करणें-मारणें**—(युद्ध इ० कांत ) पराक्रम दाखविणें, शूरपणाचें कृत्य करणें **—रीच्या धारेवर धागविणें-धरणें-चालविणें**—(एखाद्यास) कडक शिस्ती खालीं ठवणें, जरबेंत ठेवणें सामाशब्द **०बंद**—वि १ कमरेस तरवार लटकाविलेला (मनुष्य) २ (ल) नेहमीं युद्धास, भांडणास तयार असलेला [ हिं ] **०बहादर-दूर-बहाद्दर-द्दुर**—वि १ युद्धांत मर्दुमकी दाखविलेला, शूर (मनुष्य) तरवारी २ (ल उप) तापट, भांडखोर, दुष्कर्म (मनुष्य) ३ (उप) पोकळ बढाया मारणारा, बढाईखोर ४ (ल) (एखाद्या विशिष्ट कार्यांत धंद्यांत) नावाजलेला, प्रवीण नाणावलेला [ तरवार+हिं बहादुर=शूर ]

**तरस**—पु भय, भीति 'ह बातचा तरस मोदिवासारख इत्यादी लोकास म य हें अन्यायीच आहे ' —रा ३ ९० [फा तर्स्, तुल० सं त्रस्=भिणें]

**तर(र)स**—पुन एक मांसाहारी वन्य पशु याचा आकार कोल्ह्यासारखा असून, रंग करडा असतो व अंगावर पट्टे असतात पुरलेलीं प्रेतें उकरून खाण्यांत हा पटाईत असतो हा स्वभावानें भित्रा पण कावबाज प्राणी आहे [सं तरक्ष] **०गांड्या**—वि (अशिष्ट ) दिसावयास भयंकर पण स्वभावानें भित्रा भेकड, गाढ

**तरसणें**—अक्रि १ थकून जाणें, शिणणें, त्रस्त होणें, वैगणें, जेरीस येणें, त्रासणें पहा 'पाण्यावाचुनि फौज तरसली नवाबानें एकून।' —ऐपो २७९ २ व्याकुळ होणें 'नाहीं पाहिलें तुला तरी जीव माझा तरस।' —होला १४५ (हिं ) उत्कंठित होणें, [त्रासणें; हिं तरसना, तुल० स त्रस् तृष्]

**तरसा-शा**—पु तारसा सगाऱ्याच्या करळाशीं समांतर बसविलेल्या चपट्या अडकणांपैकीं एक (अव ) तरसे हे खटाऱ्यास ३,४ किंवा ५ असतात [स तिरस् ? ]

**तरसाट**—वि (कु) तिरसट पहा

**तरसाद**—स्त्री (गो ) एक प्रकारची तरवार [पोर्तु तरसादो ] **०वाघुरणें**—(गो ) तरवार फिरविणें

**तरसाळें**—न तसराळें, घमेल्याच्या आकारासारखें पसरट व उथळ असें लहान भांडें, कटोरा [ ?+स आलय, म आळें= भांडें ]

**तरळ-ळा तरळमोडशी**—स्त्री अजीर्णानें होणारी हाग ओक मोडशी, विषूचिका पटकी पहा 'कुळिक तरळ कामिणी।' —दा ३ ६ २५ 'हिंव ज्वर आणि तरळा। ओकिती वऱ्हाडिणी सकळा।' —ह २४ १११ [स तरल] **०मेंढा**—स्त्री जोराचा रेच, अतिसार, हगवण

**तरळ**—वि वद्द्, वदवदीत, डवडवीत (मृदंगाचा आवाज)

**तरळ**—वि १ चपळ चलाख सुरसुरीत, हलक्या अंगाचा; तरतरीत २ तरल पहा [स तरळ]

**तरळ तरळकी**—वि तराळ तराळकी पहा [ तराळ ]

**तरळाखार**—पु गावचा महार कामगार —वाडमा २ २५४

**तरळणें**—अक्रि (दृष्टि, विचार, बुद्धि इ०) भाबावणें, चचल होणें, भ्रमणें, चळणें, दिपणें 'प्रमाणदिवयानिनि मवाळें। पाता तरळैले वेदाचे डोळे।' -शिशु ९ 'मुग्धा पतिस पहाया तसि माजी दृष्टि तरळली लाजे।' -मोभनु ३ ३ २ चंचलपणानें भारणें, प्रकाशणें, चमकणें 'कीं नेत्रीं बाहुली दमिली। का ते जळीं प्रतिभा भासली। कीं अकस्मात दृष्टि तरळली। तैसी ब्रह्मीं मूळ माया।' -स्वादि १३ ९ ९८ ३ खेळणें 'जे इंद्रिया आणि उद्दीं। माझारिलिये सर्धी। रजोगुणाच्या रासीं। तरळत असे।' -ज्ञा १३ १०४ [स तरल]

**तरळणें**—अक्रि १ तरळाच्या, अजीर्णाच्या, मळमळीच्या विकारानें युक्त होणें २ (ल) कंटाळा, वीट, किळस इ०नीं युक्त होणें, ओकारी येणें [तरल=मोडशी]

**तराई**—स्त्री डोंगराच्या पायथ्याशीं असलेली दाट झाडीनें युक्त अशी सखल जमीन [तर+राई हिं तराई स तरु=झाड+राजी=रांग]

**तराई**—स्त्री (खा) जिनिंग फॅक्टरीचा उद्घाटनसमारंभ -ज्ञानप्रकाश १७ २ ३१

**तराकू**—स्त्री (जरतारी धंदा) बादलें (चपटें सूत) गुंडाळणारें पोलादी यंत्र, चाती, (इ) स्पिंडल -पु चातीवर काम करणारा मनुष्य

**तराजू**—स्त्री १ पदार्थाचें वजन करावयाचें विशिष्ट साधन; ताजवा, तुला, काटा, तागडी 'कोणी वणिग्जन विकी तुलिता तराजे।' -र ११ २ (यंत्र) (तरफ) उच्चालकाचा एक प्रकार [फा तराज़ू]

**तराटचें**—अक्रि (गो) मुसक्या बांधणें

**तराठणें**—अक्रि ताठणें, तगटणें, ताणलें जाणें [तराठा]

**तराठा**—पु १ (बोलण्यातील, वर्तनातील) ताठा तोरा २ वल्गना, धडाडीयुक्त बडबड ३ खरडपट्टी, रागें भरणें, खडसावणी (क्रि० देणें) [ध्व]

**तराडा**—वि शुष्क, रसहीन (प्र) तांडा पहा

**तराडा**—पु (कों) झाडाची लांब व सरळ फांदी, सरळसोट

**तराडें**—न १ जहाज मोठें तारू गलबत 'गनिमाचे मुलखातील साहुकारी तराडीं दर्यांत असल्यिा वस्त करून घ्यावीं, धरून बंदरात आणावीं' -मराशा ३५ २ तापा पटा जया सद्गुरु तारू पुढें। जें अनुभवाचिय कास गाढ। जया आत्मनिवेदन तराडें। आकळलें।' -ज्ञा ७ ९८ [स तरड]

**तराणा**—पु (संगीत) तन, दर, नार अशा अक्षरानीं प्रबंध बांधलेली गायनातील एक सताल चीज ही चीज अर्थविहीन असते निभस बळण देण्यासाठीं प्रथम प्रथम ह्याचा उपयोग केला जात असे पुढें ती गाण्याचाहि प्रचार झाला [फा तराना]

**तराणी**—स्त्री (कर) तनी, दटावणी, दपटशा 'त्यानें तराण्या द्यायाला सुरवात कल्यामुळें मला त्याचा समाचार घेणें भाग पडलें'

**तराफा**—पु मोठा ताफा, तराडा हा दोन बोटींवर घातलेला ताफा असतो

**तराय**—स्त्री (महानु) पद्धति तऱ्हा 'विवेना तराय जाली।' -भाए ४४ 'कोविळाची तराय मोडी।' -भाए ९२ [तऱ्हा]

**तरारणें**—अक्रि (तरतरणेंचा अतिशय) अतिशय फुगणें ताठणें, तरहोणें [हिं तरार, तरतरणें]

**तरारां**—क्रिवि अतिशय तरतर, जलद, अति चपळाईनें तर तर पहा [हिं तर्रारा, तरतर]

**तरावट**—स्त्री १ (व) गुंगी, कैफ, मादक पदार्थानें येणारा अमल २ पगडा, अमल, गुण 'गोळीची तरावट तीन दिवस राहते' ३ (व) तरतरी तारवट पहा [तर्, तार]

**तरावट**—स्त्री (व) रोकड, नगद पैसा

**तरावट**—स्त्री थंडाई शीतलता, थंडपणा [हिं] ०गंगा— स्त्री (काशी) गंगेचें थंडगार पाणी

**तरास**—पु (गो) (सोनाराचा) तराजू [का तरासु तुल० स तरसू=तराफा, नाव]

**तरास, तरासणी**—पुस्त्री. (पत्याच्या खेळात) १ पत्ते, गंजिफा इ० कांची गड्डी करणें पत्तेकाट (क्रि० करणें, देणें) २ पत्ते गंजिफा काटण्याची पाळी [फा तराश़=काटणें]

**तरासणें**—सक्रि (पत्याचा खेळ) (पत्याची, गंजिफाची गड्डी) काटणें [तरास, हिं तराशना]

**तराळ**—वि सावध -शर

**तराळ**—पु १ महार, कोळी इ० हलक्या जातीचा व हलक्या दर्जाचा गावकामगार हा बारा बलुत्यांपैकीं एक असतो वेठ नेण्याचें व वाट दाखविण्याचें याचें काम असतें, बिगारी २ गस्तवाला घरटीकार फिरता पहारकरी 'मारीनि विवेकाचा तराळु' -शिशु ३०४ ३ (ज्याच ठिकाणीं हें गस्तीचें काम महाराकडेच असतें त्यावरून) महार गावकामगार तेणें बोभाटें तराळ येउनि तयातें पुसति।' -पच ५१ [का तलीर ते] **तराळीण-न**— स्त्री गस्त घालणारी स्त्री 'दिग्वी यमाची तराळीन।' -भज ७३

**तराळकी**—स्त्री तराळाचें काम हमाली, वेठबिगारी 'तराळकीचा वयधा नाहीं पाटिलकीचा तोरा।' -पग्र ८३ [तराळ]

**तराळी**—स्त्री खळ्यात धान्य झोडपताना दाणे इकडे तिकडे उडू नयत म्हणून सभोंवार घातलेलें गवताच्या पेंढ्यांचें वेष्टण, वढा

**तरि**—स्त्री नाव नौका, होडी, तर 'बुडे बुडवि सागरीं तरि सुकाणियाविना।' -केक ११७ तर, तरी पहा स तॄ=तरणें]

**तरिका**—पु १ चाल, शिष्टाचार २ सलोखा, सख्य 'पण्डित प्रधान व नबाब निजाम याचा तरिका एकमेकांचा कदिमी पासोन चालत आला, हुब वे त्यासी जुदगी नाहीं' —रा १० १६५ [अर तरीका]

**तरिया**—स्त्री नौका, नाव, तरी [स तरि]

**तरिया**—स्त्री खळगा —शार

**तरी**—स्त्री नाव होडी, नौका 'तुम महामृत्यूचिया सागरीं। आता हे त्रैलोक्यजीविताची तरी।' —ज्ञा ११ ३४८ [स तृ]

**तरी**—स्त्री १ खाडी 'समुद्रीं दाटे भरितें। तें समुद्रचि भरी तरियातें।' —ज्ञा १३ ३०६ 'तरीकरिता मीठ जालें।' —रा ८ ३.६ २ जलमार्गे याच्या उलट गुशरी ३ पाणी धरणारी जमीन भातजमीन [स फा]

**तरीं**—न (राजा) रेव, कचरा (अन, पोहे इ० कातील) [का तरि]

**तरी-(रि)-रीं**—उभ १ तथापि, तदपि, तसें असूनहि २ निदान, कमींत कमी 'मला पोटापुरतें तरी द्या' ३ (काव्य) तर 'अशी तरि कृतज्ञता हरि तुझ्याच ठायीं अगा।' —केका ९९ ४ म्हणून, त्यामुळें 'आम्ही असा नृपसुते तरि काचनाचे।' —र २५ याच्या जोडीला जरीं शब्द येतो [स तर्हि] **तरीच**-तरच पहा **तरीं पण**-तथापि, असें असूनहि याच्या जोडीला जरीपण शब्द येतो

**तरीक-ख**—पु मार्ग रस्ता इकडील येकसु व एक-दिलीचा तरीक सावीक होता —पया ४६८ —क्रिवि प्रकारें, रीतीनें, म्हणून 'पातशहास सरकारची गरज न दाखविता सलाह तरीक समर्पक विनती केली —दिमरा १७ —वि १ योग्य तुल्य, समान आणखीही तोफा तरीक जिनसाचा शोध करीत आहों' —ऐकिप्र २ ६१ २ दाखल बजा सारखा पाच लक्ष रुपये जास्ती नजराणा-तरीख ठगऊन त्याचें काम त्याचप्रमाणें रहाल ठेविलें आहे' —एपि १ र तरीक]

**तरीन**—तारतम्यदर्शक प्रत्यय (स) तर उदा० कमतरीन् पहा [फा]

**तर्हि**—उभ तरी होऊनी निगमल्पक तू परतही येथें रीढ।' —गीतचंद्रिका २ [स तर्हि]

**तरु**—पु वृक्ष झाड [स] ०तल-न झाडाच्या खुल्या खालची जमीन [स तरु+तल=] ०राज पु मोठें माड वृक्ष श्रेष्ठ हा तो त्यागतरुवर। जो गा मोक्षफळें य थोर।' —ज्ञा ८ १०३ नव्र गेली फलभारें तरुवर मारें' —शाकुंतल ५ पृ ४८ [त+रा श्रेष्ठ]

**तरु-ण**—न १ रोप राह भाताचें तरु माशीलें' —रा १० २११ २ (१) उपयोग करण्यासाठीं तरुण व फा रख पण

**तरुण**—वि तरणा जवान युवा १० वर्षां मन प्रौढ दशेला पावलेला [स] सामासशब्द— ०पण—न तारुण्य यौवन ०पिढी—स्त्री नवी प्रजा, तरुण लोक 'दशाची उन्नति व्हावयाची असेल तर ती जोमदार तरुणपिढीच्याच हातून' —निबु ९६ ०सूर्य—पु मध्यान्ह, मध्यान्हकाल [तरुण+सूर्य] —णास्थि—स्त्रीन कामलास्थि, मृदुस्थि [तरुण+अस्थि=हाड] **तरुणी**—स्त्री तरणी, तरुण स्त्री, युवती, सोळावर्षापासून बत्तीस वर्षापर्यंतच्या स्त्रीला तरुणी म्हणतात —योर ११३०

**तरुणोपाय-च**—पु धडगत तरणोपाय पहा 'तरी सताची वर्णावी कीर्ति। तरुणोपाय विश्रांति अन्य नसे।' [तरणोपाय अप]

**तरोटा**—पु टाकळा, तरवड पहा हा बगाल व हिंदुस्थानच्या उष्णभागात दरवर्षी उगवतो गजकर्ण व नायटे यावर याचा उपयोग करितात याच्या बिया भाजून कॉफीच्या ऐवजीं उपयोगात आणितात —शाका-त २६

**तरोड**—पु तरवड पहा **-डी रंग**-पु तरवडापासून काढलेला कातडी कमावण्याचा रंग

**तरोळी**—स्त्री (व) १ सखल जागा २ ल्हानसें तळें, डबकें 'पावसाळ्यात गावाभोंवतीं पुष्कळ तरोळ्या असतात'

**तर्क**—पु १ तर्कशास्त्र, न्यायशास्त्र प्रत्यक्ष, अनुमान इ० कावरून पदार्थाचा निर्णय समजण्याची विद्या 'तरी तर्कु तोचि फरशु। नीतिभेदु अकुशु। वदातु तो महारसु। मोदकु मिरवे।' —ज्ञा १११ २ अटकळणें, अनुमानानें जाणणें, ताडणें ३ अनुमान सिद्धात अनुमिति अनुमान, सिद्धात (क्रि० करणें बाधणें) ४ लक्षणदर्शनावरून झालेलें एखाद्या पदार्थाचें, गोष्टीचें ज्ञान, कल्पना, अनुमान 'अविद्या नाशी तर्का। तैसें होये।' —अमृ ६ ४६ 'विचार करू लागलें म्हणजे अनेक प्रकारचे तर्क उत्पन्न होतात' ५ पूर्वलक्षणावरून भावी गोष्टीचा केलेला अदाज अंदाज, अटकळ 'हा तर्क करीत बसण्यापासून आपल्याला लाभ नाहीं —कोरि ०० 'यदा पर्जन्य चागला लागला तर वरून स्वस्थता होईल असा कै दिसतो' ६ अक्कल बुद्धि मति 'त्या शास्त्रांत माझा तर्क चालत नाहीं' ७ कुतर्क कुकल्पना, मूर्खपणाचा विचार कल्पना युक्ति ८ (ल) खबर वर्तमान वृत्त बाढें तरी तूम्ह लपवावा। बाहर तर्क कहीं न यावा।' —ह ३१०२ [स] सामासशब्द— ०कौशल्य—न अनुमान, अटकळ कल्पना करण्याचें चातुर्य प्रावीण्य कल्पनाचातुर्य [तर्क+स कौशल्य=कुशलता] ०गम्य-वि तर्कानें जाणता येणारें, अनुमेय, तर्क्य [तर्क+स गम्य= जाणण्यासारखें] ०बाज—वि वादविवादपटु कुशाग्रबुद्धि धूर्त मर्मज्ञ [तर्क+फा बाज] ०बा —पु बुद्धि बुद्धिसामर्थ्य मन [illegible] एक [illegible] [illegible] करण्याची हातोटी, कुशलता [तर्क+विद्या] ०शास्त्र—न प्रत्यक्ष

अनुमान इ०कावरून एखाद्या गोष्टीचा निर्णय, शुद्धाशुद्ध अनुमान करण्याचें शास्त्र, न्यायशास्त्र तर्क अर्थ १ पहा 'पाश्चात्य देशांत तर्कशास्त्राचा उदय प्रथम प्राचीन ग्रीक लोकांमध्यें झाला' –ज्ञाको –त ७० ०ज्ञान–न अनुमान करण्याची शक्ति तर्की –वि १ नैयायिक, तर्कशास्त्रज्ञ २ मार्मिक धूर्त, मर्मज्ञ, तारतम्य ज्ञानी [ तर्क ]

तर्कट—न १ भलताच तर्क, कल्पना, कुतर्क २ (एखाद्या वर आणलेलें) कुभांड, आळ, बालट तरकट पहा –वि तर्कटी, कुभांडखोर, कुतर्क काढणारा, कडचा पिकविणारी [ तर्क ] ०पणा–पु बनावटपणा, कुतर्कवृत्ति 'एतद्देशीय पूर्वजाविरुद्ध पुष्कळच हेकटपणाचा व तर्कटपणाचा मजकूर सांप्रत इतिहासांत आला आहे' –नि ६१५ [ तर्कट+पणा ]

तर्कटी—वि तर्कट पहा १ भलताच तर्क काढणारा, कुतर्क करणारा २ (गा) कुभांड रचणारा, बालटखोर ३ (गो) बुद्धिमान, कल्पक [ तर्कट ]

तर्कणें—उक्रि अटकळ करणें, अनुमानानें समजणें, तरकणें ऐसे या रुखाचें होमेंजाणें। न तर्के होतेनि वहिलेपणें। –ज्ञा १५ १२१ 'तरी ऐसे तर्कतमे काहिं।' –रास २ ५२४ [ तर्क ]

तर्कश—स्त्रीपु भाता, तरकश पहा 'रणभूमिवरि तुला निजवील। रामतर्कशाचा तीर।' –मध्व ६६ [ फा ]

तर्कीम—स्त्री लेखन तरकीम पहा –रा ३ ७३ [ अर तर्कीम् ]

तर्क्य—वि तर्कानें, अनुमानानें समजण्यासारखें, बुद्धिग्राह्य [ स ]

तर्जणें—सक्रि १ तुच्छ मानणें धिक्कारणें 'सहस्र बाहु अर्जुन। जो प्रख्यात तो तर्जुन।' –मोरा घनाक्षरी रामायण ९ २ मोडणें, नाकारणें, ग्यानें यवडें विघ्न आलेया दारुण। कैसेआ ठेव तें मनुक्षेरग। मनोनि का न तर्जी आणु। पग तर्जिन साच।' –ख्रिपु २ ७ ४ [ स तर्ज्=निंदा करणें, तर्जन ]

तर्जणें—अक्रि गर्जणें –शर

तर्जन—न १ निर्भर्त्सना निंदा हेटाळणी दूषण, टपका २ दहशत धाक 'तीचें चिन्ह असें कीं तर्जन अणि ताडनादि जाणवितें।' –अकक २ गंगाधरकृत रसकल्लोल ६३ [ स ]

तर्जनी—स्त्री १ हाताचें अंगठ्याजवळचें बोट २ (तजा) तर्जनींत घालावयाची एक प्रकारची अंगठी [ स ]

तर्जुणें—सक्रि (गो) १ पारखणें अदाजणें २ उमगणें, समजणें [ तर्क ? ]

तर्जुमा—पु भाषान्तर अनुवाद तरजुमा पहा 'केवळ व्याकरणशुद्ध व रूढीशुद्ध मोघ्या रीतीचा तर्जुमा इकडे उतरला म्हणजे पुरें झालें' –नि १८९

तर्जुमान—पु सरकारी भाषांतरकार तरजुमान पहा [ फा ]

तर्णक—न वासरू, वत्स [ स ]

तर्तीब—स्त्री तरतीब पहा

तर्तूद—स्त्री तरतूद पहा

तर्पण—न १ तृप्त करणें, संतुष्ट करणें, (इच्छा इ०) पूर्ण करणें, पुरविणें २ तृप्ति, समाधान, संतोष संतुष्टता ३ रेलचेल, परिपूर्ति अतितृप्तता, धालेपणा ४ (धर्मशास्त्र) नित्याच्या ब्रह्मयज्ञांत अथवा श्राद्ध वगैरे विशिष्ट कर्मांत देव, ऋषि व पितर यांना उद्देशून उदक देण्याचा विधि ५ (वैद्यक) डोळे इ०कांत (तूप इ० औषधिद्रव्यें) भरपूर घालणें [ स ]

तर्पण्या—वि (ल) कृपण, कंजूष, हाताचा जड, कद्रू [ तर्पण ]

तर्पिणें—उक्रि संतोषविणें, तृप्त करणें, तृप्त करणें 'निज स्तुति तुम्हा रुचे स्तविति त्या वरें तर्पिता।' –केका २८ [ स तर्पण ]

तर्पित—वि तृप्त झालेला, केलेला, संतोष, समाधान पावलेला, संतुष्ट, तृप्त [ स ]

तर्फ—स्त्री तरफ पहा

तर्फात—स्त्री अफरातफर तरफात पहा –वाडमा २ ४२

तर्वेज—वि तरवेज पहा

तर्मुंड—न तरमुंडी पहा १ डोकें खुपसणें, डोयखुपस २ लुडबुड –वि डोकें खुपसणारा, डोयखुपशा, लुडबुड्या 'जाला तोंडाळ तर्मुंड। माहापापाडी।' –दा ५ ३ ७६ [ तर+मुंड=डोकें ]

तर्‍या—पु होडीवाला, नावाडी [ स तरी ]

तर्‍यापोती—वि (गो) अगदीं सहज फाटणारें (पान इ०) [ ध्व टरें ]

तर्रं—वि तर ताजें ओलें रसपूर्ण तर (–वि) पहा

तर्रं—क्रिवि तट अतिशय तरारेल अशा रीतीनें फुगून तट होईपर्यंत; फुटेपर्यंत जागा न राहण्याजोगें (भरणें, पोट–फोड इ० फुगणें) 'वावडें खातांच दुसऱ्या दिवशीं फोड फुगून तर्रं झाले' [ ध्व तर् ]

तर्राठ—वि (माळवी) तीक्ष्ण [ तर्रं ]

तर्लुक, तल्लुक—स्त्री (गो) माडाच्या राखणीची मजुरी, रखवाली 'या बागाची तल्लुक कोणाला दिली आहे ?' [ स तल=ताडवृक्ष+फल=फल फळ हिं ?ल्लुक=ताडफळ ? ]

तर्ष—पु तृषा इच्छा हेतु वासना 'पूर्ण करी रुप तें तर्षे पावेन फार हर्षातें।' –वारंथरकृत गजसुखचरित्र १८ [ स ]

तर्षित—वि तृषित तहाननें व्याकुळ झालेला [ स ]

तऱ्हा—स्त्री १ प्रकार भेद जात 'लढाई रंग तऱ्हेनें झाली' –रा १० १९७ २ रीत पद्धति मार्ग 'आमची पत्र्याची तऱ्ह

आपण कहाणतील, ती कांहीं दिसोन आली नाहीं '–रा १२ ११५ ३ (ल) परिणाम शेवट 'पण त्या दोघांच्या दोन तऱ्हा झाल्या' –इप ५८ [अर तर्ह्] (वाप्र) तरतऱ्हा–तऱ्हातऱ्हा करणें–१ मनस्वी चेष्टा, चाळे, ढंग करणें २ (कर्माची षष्ठी) (एखाद्यास) अनेक प्रकारांनीं छळणें, त्रास देणें, (एखाद्याची) कुचेष्टा करणें तऱ्हेस–तऱ्हीं भरणें, तऱ्हेस पेटणें–भलत्याच गोष्टीच्या नादीं लागणें हट्टास पेटणें हट्टाची लहर येणें 'तऱ्हे भरोच नय्र सुचाव न ना उपाये।' –दा ११ ५ ११ 'हें पोर एकदा तऱ्हीं भरलें म्हणजे कोण्हाचें ऐकत नाहीं' तऱ्हेस जाणें–विक्षिप्त चमत्कारिक वागणें, स्वैरपणानें, विलक्षण रीतीनें, स्वतःच्या लहरीनें वागणें –तऱ्हेस तऱ्हे देणें–(एखाद्यास) बेफामपणानें, उच्छृंखलपणानें, स्वैरपणानें, चमत्कारिक रीतीनें वागण्यास प्रवृत्त करणें सामाशब्द– ॰तऱ्हीं–वि नाना तऱ्हेचा, विविध, निरनिराळ्या प्रकाराचा 'वीस पचवीस ताफानी तऱ्हातऱ्ही येणेंप्रमाणें नबावानें पाठवावें' –ख ८७१ [तऱ्हा द्वि] तऱ्हेचा, तरतऱ्हेचा, तऱ्हेदार–वि १ अपूर्व, विलक्षण, नव्या विशेष प्रकारचा, नव लाईचा 'हातांत जर्मनसिल्व्हरच्या झाकणाची तऱ्हेदार चौत घेतलेली आहे' –सुद ३० २ सुंदर, सुरेख, दिखाऊ, देखणा 'पानदान चांगलें तऱ्हेदार आहे' –रा ३ ४८७ तऱ्हेबाज, तऱ्हेखोर–वि १ तऱ्हेवाईक चमत्कारिक स्वभावाचा (मनुष्य) २ लहरी, स्वच्छंदी, छांदिष्ट 'तऱ्हेबाज ती अर्धीच खिलाडू नवऱ्याच्या गोष्टी ऐकून।' –पला ७८ [तऱ्हा+फा बाज प्रत्यय] तऱ्हेवाईक तऱ्हेवार–वि १ विशिष्ट तऱ्हेचा २ चमत्कारिक, विलक्षण विचित्र विक्षिप्त (व्यक्ति, वस्तु) ३ अपूर्व, अप्रतिम, नवीन तऱ्हेचा ४ (ल) सुंदर, दिखाऊ 'तऱ्हेवार कापड [फा]

तऱ्हाट(ठ)णें—अकि (प्र) तराठणें पहा

तऱ्हाटा–ठा—पु ताठा, तोऱ्यानें, ताठ्यानें युक्त वर्तन, भाषण, तराठा पहा (क्रि॰ देणें) [तराठा]

तऱ्हाण—न (पाणी, चिखल, मूत, रक्त इ॰ इकडे तिकडे सांडल्यानें होणारी) घाण, दुर्गंधी, रवड, ढाण

तऱ्हावणें—अकि (कों) तरणें [तरणें]

तऱ्ही, तऱ्हि—उभ तरी, तरीहि, तरीं पहा 'थोंटा बधिर दमेकरी। तऱ्ही ताठा न सांडी।' –दा २ ३ ३३ 'मेला कीं तऱ्हि कसा तच्छोकें मेजया न मेलों मी।' –मोकर्ण ६ २२ याच्या जोडीचा शब्द जऱ्ही [म तर्हि म, तरी+हि]

तऱ्हें, तऱ्हें—उभ तरी, तरीदखील, मुद्दा 'तऱ्हें प्रबधलतेची वेंतु। बाहती दिसे।' –शिशु २२ 'तऱ्हें तयाचें वचन न करिच।' –पंच ३ १९ तऱ्ही पहा [स तर्हि, म तरीहि]

तळ—न १ तळ, बूड आंतील, खालचा भाग २ जमीन, पृथ्वी भूमि ३ (समासांत) (एखाद्या अवयवाचा, वस्तूचा) पसरट सपाट भाग, पृष्ठभाग, तळवा जसें–चरणतल पादतल=तळपाय, करतल, हस्ततल=हाताचा तळवा, भूतल पृथ्वीतल=पृथ्वीचा पृष्ठभाग ४ (भूमिति) सपाटी, पातळी, पृष्ठभाग (इं) प्लेन [स] सामाशब्द– ॰दर्शिका–स्त्री (वस्तु) कोणत्याहि जागेची समुद्रसपाटीशीं तुलना करता उंचसखलता मोजण्याचें यंत्र (इं) लेव्हलिंग् इन्स्ट्रुमेंट [तल+स दर्शिका=दाखविणारी] ॰पर्यंत–पु पृष्ठभाग, पातळी, सपाट प्रदेश [तल+स पर्यंत=बाजू, परीघ] ॰पुष्पपुट(करण)–न (नृत्य) नर्तकानें उजव्या पायाचीं बोटें जमीनीवर टेंकून त्यावर उभें राहावें व उजव्या हाताचीं बोटें वर एकमेकास चिकटवून तळहात खोलगट करून हाताचींहीं बोटें वर करावींत नंतर त्या हाताच्या तळहातावर दुसऱ्या हाताचीं बोटें चिवटवून ठेवावीं व हे हात डाव्या बाजूस ठेवावे व डावी बाजू किंचित् वाकवावी या सारखी कृति [तल+पुष्प=फूल+पुट=पुडा+करण=करणें] ॰मुख(संयुतहस्त)क्रिया–स्त्री (नृत्य) चतुरक हस्त या क्रियेंतील हाताच्या बोटांखालीं असलेला अंगठा दूर करीत करीत हंसपक्ष हात करणें मग असे हे दोन्ही हात शरीराच्या आड न येता तळहात परस्पराच्या समोर येतील असे ठेवणें इ॰ क्रिया ॰सस्फोटित(करण)–न (नृत्य) उजवा पाय भरा भर उचलून पुढच्या बाजूस खालीं आपटणें व टाळ्या वाजविणें [तल+स सम्फोटित=आपटणें] तलातल–न १ सप्तपातालांपैकीं चौथें [स तल+अतल] २ द्वंद्व युद्धांतील एक प्रकार यांत एकमेकाच्या तळहातावर तळहातानीं प्रहार करितात [तल+तल] तलावर्त–वि घोड्यावर बसणारा वा पाय भोंवऱ्यास लागतो असा भोवरा असलेला (घोडा) –मसाप २ १५८ [तल+आवर्त=भोवरा]

तलक—स्त्री घरफोड, काडीमोड, तरख पहा [अर तलक्]

तलख, तल्लख—वि १ तिखट, जहाल कडक, तीक्ष्ण २ चंचल आवेशयुक्त, चपळ तातडीनें काम करणारा ३ (दारूकाम) एकदम जळणारा (तारा) 'हवयाची दारू अमळ मंद जळणारी व तारे तरख अपात्र लागतात.' –अग्निक्रीडा ११ ४ तामसी, रागीट, तापट ५ करारी, बाणेदार [फा तल्ख]

तलखली—स्त्री १ ताप आल्यानें होणारी आग, कणकण, तरफड २ (मनाची) उत्कंठा, उत्साह, अधीरता ३ मानसिक अस्वस्थता अशांति, तळमळ, मनस्ताप [तलख]

तलखवथा—वि १ रागीट जहाल तामसी संतापी २ आवेशयुक्त, तरख उत्साही, तरख पहा [तरखउगी]

तलखी तलखाई, तल्खी—स्त्री १ (पदार्थांचा, दारूगिरीचा, मसाल्याच्या द्रव्याचा) तिखटपणा, जहालपणा जरणी, तीव्रता, कडकपणा २ (सूर्य, अग्नि इ॰ कांच्या) उष्णतेची तीव्रता जाळीमपणा जरणी उष्मा; दाह ३ (ज्वरामुळें होणारी)

खरखर, फणफण तरफड, काहिली ४ ( ? ) तापटपणा, कडकपणा, आवेशातिरेक; कचका, तल्खपणा 'तल्खी सोडून शातता धरून वत वें ' –ख ३ ४७९ [फा तल्खी]

तलग—पु प्रेम –वि प्रेमळ –मनरो

तलग—न १ पिल्लू, बालक 'तलगासीं कमळें। चारा वानिति मराळें।'–ऋ ६१ 'जैसें शारदियेचे चद्रकळ–। मार्गी अमृतकण कोंवळे। त वेंचिती मनें मराळें। चकोरतल्लें।' –ज्ञा १ ५६ २ (कु गा ) कोंबडीचें पिल्लू हें आवरत नाहीं –वदलापूर ४९२ –वि लहान, अल्प (स्त्री, पुरुष) 'तव त्या तलगा गोळणी नारी।'–निगा ४२ –मत्र १६० तलँगी, तलंगी–स्त्री १ (माण) अंडीं घालण्याच्या वयास न आलेली कोंबडी २ तरुणी

तलपर्णे—अक्रि (क) (विरू) तळपणें, एखादा पदार्थ मिळविण्याचें सधान साधण्यासाठीं त्याभोंवतीं घिरट्या घालणें तळपणें पहा

तल्फ—न दाराचें झडप, फळी उदा० एक तल्फी=एक झडप असलेलें, दुतल्फी=दोन फळ्या असलेलें (दार)

तलफ—स्त्री (गंजिफाचा खेळ) गंजिफाच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द दुसऱ्याच्या हातातील वजीर इ० पडून आपल्या हातातील एक्का, दुर्व्या इ० पानें हुकूम करण्याकरिता त्या रगाचें पान आपल्या जवळ नसल्यास आपण जें पान पाठचें टाकतों त्यास तल्फ म्हणतात, उपडपाना दगी [अर तल्फ्]

तलफ तलुफ—स्त्री वाईट खोड तल्ब पहा तल्फी–ची–वि अमली, शौकी, कैफी, व्यसनी [तल्फ]

तल्फ—वि उध्वस्त वेचिराख, आमाड 'मुद्दारी ना देवराव सुभा यऊन पुणें जाळून लुटून तल्फ केलें ' –दम ७६ –पदसमा २१६ [अर तल्फ्]

तल्ब—स्त्री १ वाईट व्यसन, खोड, चरक चट २ व्यसनी मनुष्यास व्यसनाच्या पदार्थाच्या सवनाची होणारी तीव्र इच्छा, हुकी ३ पगार, तनखा मजुरी, मुशाहिरा तुंबलेला पगार ४ सावकारानें सरकारनें कुळाकड केलेली पैशाची वसुलाची मागणी तगादा 'अविंदाचें राज्य वद्रीं असता। कागद पाहता तल्ब केली।'–तुगा ४४३६ 'सरकारी बोलावणें हुजूर राहण्यावद्दल्चा हुकूम; (६) समन्स् 'बालाविलें तें करोनि तल्ब।'–दावि २०२ हें जाणून त्यास तलब करून हुजुर आणिला –चित्रगुप्त ७८ ६ समन्स बजवणाऱ्या वसुलाचा तगादा करणाऱ्या शिपायाचा रोजमुरा मजुरी ७ (सामा) बोलावण्याची क्रिया आमत्रण बोलावणें 'दसानिया राजा मनाप पावला। म्हणे व्यर्थ त्याला तल्ब करी।' तल्फ पहा ८वरात मागणी त्यास आपली तल्ब रुपये एक हजार ' –वाडबाबा १४१ [अर तल्ब्] सामासिकशब्द– ०तनखा–तरखा–स्त्री पगाराची 'पाचशें गाड्याची तल्ब तनखा वरचेवर तुम्ही पाठवीत जावी '–दिमरा २ १०६ ०दार–वि १ व्यसनाच्या पदार्थाची तल्ब ज्यास येते तो २ पगारदार ३ पैशाची, वसुलाची मागणी, तगादा करणारा, (६) बेलिफ् ४ चौकशी करणारा तलबाना, तल्बाना–पु १ वसुलाचा तगादा करणाऱ्या सरकारी शिपायास बलिफास कुळानें द्यावयाचा भत्ता रोजमुरा तगाद्याची दस्तुरी, (६) प्रोसेस् फी 'नजराणा व तल्बाना वगैरे कुळाव पाहिजे ' –वाडबाबा १४९ २ (सामा) रोजमुरा, पगार, मुशाहिरा साळा राज अत्यह तल्बाना गाड्दी याम द्यावा लागतो ' –ख १ ४४४ [फा तल्बाना] तल्बा–वि व्यसनी, तलफी पहा [तल्ब]

तलम—वि १ बारीक व मृदु (सूत इ०) २ बारीक विणीचें, व मृदु सुताचें फार पातळ (वस्त्र इ०) ३ नाजूक सुकुमार पाशाखी (प्रकृति इ०) [?] सामाशब्द– ०सुती–वि तलम सुताचें, बारीक विणीचें (कापड, धोतरजोडा इ०) [तलम+सूत] –माई–स्त्री (कापड, सूत इ० याचा) बारीकपणा, तलमपणा [तलम]

तलयारी—पु (तंजा) पोलीसपाटील

तल्वार, तलवारबहादर—तरवार इ० पहा

तलवून—पु अनिश्चितपणा, चंचलपणा [अर तलव्वुन्] ०मिजाजी–स्त्री अनिश्चितपणा लहरीपणा 'रियासतींत मोठी गाष्ट वचनाची कायमी त्यात तलवून–मिजाजी झाल्यास व इतराशी वातल होऊ लागल्यास लाचार ! '–ख ७ ३५७४ [अर तलव्वुन्+मिजाजी]

तलाख—स्त्री शाप, एक दिव्य तलाख पहा 'जो काणी लिहिल्याप्रमाणें न ऐके त्यानग शपथ असे, त्याचे आईवर तलाख असे '–ऋच १२ [अर तल्क्=काडीमोड]

तलाठी, तलाठदार—पु सरकारी वसूल गोळा करणारा गावकामगार, कुळकर्णी [गु तलाटी]

तलातल—तल मध्यें पहा

तलालोरी—वि तालबद्ध सुरल पावा वाह (वाजे ?) तलालोरी नाटु उमटे ~वरीं। –नागा ३६१ माहूऱ्या पर्वे तलालोरी। नाचती गर्जी गीत गाती। –निगा ८८ [ताल+?]

तलाव—पु मोठें तळें सरोवर [स तडाग, प्रा तलाग, फा तलाव, तालाब्]

तलावा—पु १ रात्रीचा पहारा गस्त बागेपलीकड तग ज्यास फौज रवाना केली –ख ८ ३९१९ पालख्या शिवाय घोडेस्वार। तलाव देता चक्राकार। –भपला ५० २ फिरणें, पाय मोकळे करणें, फेरफटका ३ टेहळणी करीत फिरणारी सैन्याची तुकडी तलावा आला तिकडून पठाण्याचा।'–ऐपा २७६ ४ –क्रिवि टहळणी करीत 'अलाहिदा लष्कर घेऊन तलावा फिरों लागले ' –इम ६ [तुर्की तुलावा, फा तलाया अर तलाइअ=टहळणी करणारी लष्करी टोळी, अर तिलावा]

**तलाश-स**—पु १ (एखाद्या गोष्टीचा, मनुष्याचा) शोध लावण्यासाठीं केलेला प्रयत्न, चौकशी, तपास 'चारे मर्दे कुआचे उपयोगी पडे याप्रमाणें तलाश करून ठेवून पाठविणें '—रा१ २०९ २ वरील प्रयत्नानें लागलेला शोध पत्ता, मागमूस तपास [फा तलाश्]

**तलाशी-सी** स्त्री शोध, तपासणी झडती झाडा तलाश पहा 'तुम्ही याचे घरीं जाऊन तलाशी घऊन या '—विक्षिप्त २ ७८ —वि हरवलेल्या वस्तूचा शोध करण्याचें ज्याचें काम आहे असा (मनुष्य) [फा तलाश्]

**तलुग**—न सधान, लालुच —दार

**तल्पा**—स्त्री तल्खी पहा [फा]

**तल्प**—न शय्या, बिछाना, अंथरूण 'हीं उपधानें न सुख या तल्पीं।'—मोभीष्म ११ १३७ २ (ल) स्त्री, पत्नी 'गुरु-तल्पा' [स] सामासशब्द– **तल्पगी**-वि व्यभिचारी, मातृ-गमनी 'कृतघ्न तल्पगी नारकी। आतितयांई जल्पक।'—दा २ २ २६ [स तल्प+ग] **०ठाण**-न शरीराचा गुह्यभाग —दार [तल्प+न स्थान]

**तल्वाना**—पु तल्वाना पहा [फा]

**तल्ख-ख**—स्त्री शाप शपथ, धमकावणी तलाख पहा 'फत्तेसिंगमानी यार्णी तल्ख लिहून पाठविली। असी लढाई करा म्हणावें मागें मोहरें नाहीं जाहली।'—अफला ४४

**तल्लख**—वि १ चलाख हुशार चपळ जहाल २ (व) तिखट जहाल कडक ही तमाखु फार तल्लख आहे ' तल्ख पहा [फा तल्ख]

**तल्लाख**—पु १ शाप एक शिवी तलाख पहा ही शिवी धाय काना लावतात त्याच्या आईवर तल्लाख ' २ घस्फोट काडीमोड ३ शपथ आणेशा (क्रि० घालणें असणें, सुटणें, मोडणें) [अर तल्क्]

**तल्लाल-श तल्लाशी सी**—तलाश इ० पहा

**तल्ली तोल्ठी**—स्त्री (गो) ल्हान मुलाच्या पायात घालण्याचा रुपेरी दागिना तोरडी [तोरडी]

**तल्लीन-ण**—वि (एखाद्या गोष्टींत, विषयात) निमग्न गुग दग एकरूप तद्रूप [स तल्लीन स तत्+लीन=बुडालेला]

**तल्लु तोल्ल**—पु (गो) माडाचा राखणदार तर्लुक पहा [स तत्र-ताड?]

**तल्लुक**—स्त्री (गो) तलुक पहा माडाची राखण

**तव तत्र तवई**—स्त्री (पित्तादिकामुळें येणारी) तिरि मिरी घेरी मूर्च्छा बेशुद्धि भोंवळ; तवा (क्रि० येणें) 'धनुष्या घालिता कव। शोक गला आली तव। रावणासी।'—मध्व ३७ 'जनकोजी शिंदे यास तवई येऊन घोड्याखालीं आले '—भाव १४ [स तमस्=अंधार]

**तव**—पु आवेश, जोर तवक पहा [स तवस्=बळ]

**तव**—पु स्त्री १ पाऊस, पातळ पदर थर, तवा २ (डोळ्यावर येणारा) सारा; भुरी [स तवस्]

**तव**—सना (काव्य) तुझा 'केकयनृपभ्रात दोष त्यातील एक तव पद।'—मोकण ४ ११ 'तव चरणीं ठेऊनि माथा।' [स तव=युष्मन् सर्वनामाच्या षष्ठीचें एकवचन]

**तव**—क्रिवि (काव्य) १ तव्हां तों 'तव ते नारदु भणे।'—शिशु १२९ 'तव तेथें पातला नारद।' २ तोंपर्यंत जव याचें अनुयोगी 'कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें। —केका ४७ 'मी जंव यईन तव तू बैस' ३ तर या अर्थी पादपूरणार्थक अव्यय 'वेद तव पाचार्वे जालें। हें कर्माचें गुणीं गुंधलें।'—ज्ञा १३ ११०२ 'तू तव राजा उदार।' [स तावत्; तदा] **०पर्यंत पावतों**-क्रिवि तोपर्यंत तवर, —वरीं पहा

**तवई**—स्त्री एक प्रकारचें मातीचें भांडें मातीचा ल्हान तवा [तवी]

**तवई**—स्त्री संकट विपत्ति विपत्काल नाश (अवई=लोक वार्ता वदंती तवई=प्रत्यक्ष आलेलं संकट अवाई पहा) 'सदा शिवपन्तावर मोठा तवईचा वक्त गुजरला '—पाव १४ [अवा ईच्या जोडीला बनविलेला शब्द तुल० फा तबाही] म्हण० १ तवई पुरवते अवई पुरवत नाहीं २ तवईपेक्षा अवई कठीण

**तव(व)क तवका**—पु (काव्य) रागाचा आवेश त्वेष संतापाचा आवेग राग संताप 'एनें बोलें सनानिली। तवकें वेगीं ठेली।'—शिशु १८६ 'रमावा प्राग्ज्योतिष एसें बोलोनि वृद्ध तवकानें। —माभीष्म ५ ५७ राक्षस चढूनियां तवका। भीमहृदयीं मारी थडका।' २ आवेश जोर शक्ति सामर्थ्य 'आला धवुनि जावुवत तवकें झुजावया लागला।'—अकक २, कृष्णकौतुक ५७ तवका पहा [सं तवस्–तपक प्रा तवक]

**तवकणें**—अक्रि कोपाविष्ट होणें आवेशयुक्त होणें सक्रुद्ध होणें 'हो का ने महाकल्पाचिया अंतीं। तवकलनि धर्मे उठत तेउतीं।'—ज्ञा ११ ३४२ [तवक]

**तवक(क्कु)ल**—स्त्रीन १ ईश्वराच्या ठिकाणीं निष्ठा ईश्वराचा भरवसा आधार आमची तवकल श्रीवरी। कोणेही गोष्टीची फिकीर नाहीं '—ख १ १४२ 'खुदावर तवक्कुल ठेवून रघुनायराव याचे तम्बीचा इरादा केला '—रा ५ ८६ २ (सामा) भर वसा उमेद आशा ३ साहस धाडस जोखमीचें कृत्य [अर तवक्कुल्] **०करणें**-जोखमीचें काम साहस करणें म्हण० तवकल तवाला खुदापर हवाला

**तवका तवका**—पु १ शक्ति जोर आवेश उत्साह 'उठवला चोयर तवका। तो सुनाट पडे असिका।'—कमृ ६ ४९

'म्हणोनी तवकें उडी घातली।'—उपा ५५१ २ धैर्य, धीर 'पैं वैराग्यमहापावकें। जाळूनि विषयाचीं कटकें। अधर्पली तवकें। इंद्रियें धरिलीं।'—ज्ञा १२ ४६ ३ क्रोध, संताप [तवक]

तवक्का—पु आशा 'गुजस्ता दुनियाईचे आल्मात जितक्या तवक्याच्या बाकला आहेत त्या तर्फेन दरगुजर करून हर तर्‍हेनें निफाक पाडावयासी कसूर करणार नाहींत'—पया ४७८ [अर तवक्कुअ=आशा]

तवक्षीर-खीर,तवकील-खील—न १ बांबू, गहूं तांदूळ जव इ०कापासून काढलेलें सत्त्व २ आरारूटच्या कांद्याच्या वल्कापासून काढलेलें एक सत्त्व हें हलकें व सहज पचणारें असल्यामुळें मुलास व आजारी माणसास याची लापशी देतात [अर तबाशीर=बांबूची साखर, तुल० स त्वक्=साल+क्षीर=दूध, हिं तबाशीर, व का तवक्षीर, गु तवखार, फा तबाशीर]

तवकूफ—पु खोळंबा, उशीर, अवकाश, तहकूब पहा 'विल्यैम आ मेहरबानाकडून ताण बसावा इतकाच तवकूफ'—रा ११ ७१ [अर तवक्कुफ्]

तवंग—पु १ पाण्यावर येणारा, पसरणारा (तेल इ०काचा) पातळ थर, तरंग, कोशंग, तवं 'दानाचु तेलज वंग सवंग झाले।'—र ५६ २ डोळ्यांत देणारा सुरीचा पापुद्रा, तारा 'कामभोगाचे तवंगें। डोळ्या पातला पातें न लागे।'—मुविराट ३ १३३ तवंगट—वि तवंगानीं युक्त [स तवस्]

तवज्जेह, तवज्जे,—न लक्ष्य, अवधान कृपादृष्टि मेहर नजर 'तर तवज्जे करून या रोखत स्वारास दर्या ठिकाण लग दऊनि तिकडून आरामसीर हत्ती घऊन यत तें बात करी पाहिजे'—ब्रच २४ [अर तवज्जुह्=अवधान]

तवट—न धैर्य, धीर 'या परी लोहदंतु पडला। स्वामी काई करीतु जाला। घाय वाजले न तवटें। आपुला सारथी सावडु केला।'—उपा १४१७ [तव]

तवणा—पु चरकांत घालून गाळण्यासाठीं केलेली उसाची कांडी, त्याची रास तवणेकरी-पु तवणा करणारा, चरकांत घालण्यासाठीं उसाची कांडी करणारा मनुष्य [तवणा+करणें]

तवतवणें—अकि (अनेक किलकट गांमें अंगावर पडल्यानें) कातवणें, चिडणें जिकीरीस येणें चरफडणें, तातवणें पहा [तव द्वि]

तवताक-ग-ख—वि १ साजेसा अनुरूप, यथायोग्य २ तयार सिद्ध ३ वदिस्त ४ रेखीव [अर ताक्=सज्ज, उत्कृष्ट] ०पणा-पु अनुरूपता, अनुरूपता, बिनचूकपणा

तवतुक—स्त्री १ (कर) त्वरा, लगबग जलदी तो तव क करून आला' २-क्रिवि (कर) लगबगीनें, जलदीनें, त्वरित. तवतुक निघा' [तवताक]



तवना(णा)स—वि (गो) उधळ्या, उच्छृंखल, कोणाचाहि दाब नसलेला

तवनी-नि—स्त्री पेज, कांजी 'जो पुरवी ब्रह्मविद्येची तवनी।'—भाए ४ 'मरणा भेणें कल्हणी। टाकी अमृताची तवनि।'—ऋ११

तवनी—स्त्री १ (महानु) तावनी, तापविण्याचें भांडें २ (ल) पीडा 'त आजन्म दु खसमाळिची तवनी। करी ब्रह्मसुकाळाधनी। नाना भवपाश निर्वाणी। छेदक शस्त्र जे।'—ज्ञाप्र २७ [स तपन, प्रा द तवणी]

तवर—स्त्री मूर्च्छा, भोंवळ, घेरी तव पहा (क्रि० येणें)

तवर, तवर—पु अंकुर, कोंवळा कोंब

तवर—पु १ वीरश्री, आवेश (क्रि० धरणें चालणें) 'उमतीचा तवर करी झड घालुन तलवार।'—पग ७९ २ जोम पाणी, तेज 'शहर पुण्याच्या भररस्त्यामधें भरनवतीचा तवर नवा।' —पला ४ १२ ३ तोरा, ऐट दिमाख तऊर पहा ४ तापटपणा, रागीटपणा, तल्खपणा [अर तहव्वुर्] तवरी—वि १तापट, रागीट २ तिरसट कुरेबाज ३ वीरश्रीनें, आवेशानें युक्त, धाडसी [तवर]

तवर—क्रिवि त्या बाजूस, पलीकडील बाजूस (प्र) तवार याच्या उलट अवार=अलीकडील बाजूला

तवर-वरी-तवरी—क्रिवि तोंपर्यंत, तोंवर, तोंपावेतों 'तवरी र त्वरी भवगजाचें भान।'—दावि १४९ [तववर अप]

तवरम, तवरलोक—क्रिवि (व) तेव्हां [तव]

तवरत—क्रिवि (व) जलदीनें, त्वरत त्वरित [त्वरित अप]

तवरें—न (गो) कथील, टीन निकल

तवलें—न १ (गो) डोकें २ लहान तवली

तवली—स्त्री १ (खा व बे) धातूचें, मातीचें पसरट आकाराचें थाळीसारखें भांडें टवळी, टवळें पहा २ (खा) मडकें, तपेली 'हांडे, कुंभ, पळया, परात तवल्या गुंडे तपेली घडे।'—सारुह ३ ४३ तव्हां तो सर्प चिरून शेन तवली ठेविली चुलीवर।'—अफला ७१

तवली—स्त्री (गो) टवका काढून नारळास पाडलेलें भोंक, टवळी अर्थ १ पहा 'ताप लागल्या जाल्यार अडसराची तवली मारून दिना'

तवल्लुद—पु जन्म आमची नियत ईश्वरास मान्य होऊन माधवराव पन्तप्रधान यांचा तवल्लुद झाला'—रा ५ ८६ [अर तवल्लुद्]

तववर—क्रिवि तोंपर्यंत [तव+वर]

तवशी, तवशीण—स्त्री (कों गो) तवशाचा, काकडीचा, पावसाळी काकडीचा वेल [स त्रपुषी प्रा तउसी]

तवशें-सें—न १ तवशीचें फळ, काकडी ही मोठी व लांबट असून आश्विन महिन्यांत होते —कृषि ५८२ ('अप्पाधप्पा' या

**घुमास**—पु चोपणी धुमस पहा

**घुमाळ**—स्त्री एक ताल धमार पहा यात मात्रा आठ व विभाग चार असतात

**धुमाळ**—न (कु) १ दशावताराच्या खेळातील मंगला चरण २ गोंधळ, घुमाळी

**घुमाळी**—स्त्री १ गोंधळ, धादल, क्षोभ, दगा, गडबड, अव्यवस्थित व जुल्माचें वर्तन 'लुनीची आवई घातली आणि घुमाळी माडली'—भाव १४८ २ चैन, चगळ, शिवड, नास धुमीची, दंगलीची मौज, धागडधिंग्याची बहार, धुडगुस, घुमाकूळ पहा ३ खेळ, धुळवड 'घुमाळी खेळती मधुकरी। प्राणनाथेसी।' —शिशु २८४ ४ हल्ला, घाला 'नृपावरी घुमाळी।'—दावि १६८ ५ भाडण, कलह 'साज सकाळीं नित्य घुमाळी दोघी सम तोली।'—पला ७७ [धूम]

**घुमाळी**—स्त्री १ चाकाची धाव २ उताण मोठा, उभा उदार

**घुमाळी**—वि १ घुमाळ तालासंबंधी, सारखा (ध्रुवपद, चाल, गति) २ अखडित, चालू असलेली चपल (गति, गति मान पदार्थ) —स्त्री ताल घुमाळ पहा

**घुमी**—स्त्री धूर निघणारा विस्तव, ज्यावर गोसावी धूर घेत बसतो ती गोसाव्याची आगटी—शेगडी धुनी पहा [धूम]

**घुंईंकसे**—क्रिवि धुमूक अशा आवाजानें नृत्यघोषानें, रुम झुम 'धुमुकमे हाननीं गर्जे मनकटा वरी।'—शिशु ४०४ [ध्व]

**घुमें**—न घुकें, धुकट [धूम, गु धुमेर]

**घुम्म(घुम)घुमकार**—पु दणदणाट, मोठा ध्वनि जाला घुम्मघुमकार।'—दावि ३३४ [ध्व]

**घुया**—पु धीटपणा, गिया पहा 'वैसेंति धुया। मातुया वरी।'—शिशु ९०१

**घुंरफुल्ल**—वि (गो) पाढरें सफेत, शुभ्र [धु-धुव+फुल्ल]

**घुर**—पु १ गावाची अथवा शेताची मर्यादा अगर सीमा २ प्रमुख, पुढारी, सेनापति धुरा 'धुर रणीं होय विन्मुख। तेव्हांचि त्याचें काळें मुख।'—एरुस्व १२ ५६ 'पडता देखोनि मुख्य धुर।'—मुवन ३ ३३ —स्त्री १ गाडीचें जू 'चला जाऊं रे सामोरे। पुढें भेगें विठ्ठल धुरे।'—तुगा ६८१ २ अग्रभाग 'पहली दक्षना मुख्य धुर।'—राविं ३१ २१३ [स धुर्]

**धुरकरी**—पु (सा) गाडी हाकणारा **धुरखीळ**—स्त्री गाडीच्या दांडीच्या टोकास लाकडाची जी खीळ घालतात ती [धुर+खीळ]

**घुर**—वि भडळ, निधिन [स धुर]

**घुरकट**—न १ धुरानें बसलेली काजळी, काळेपणा, घाण २ धुंदे —वि धूर लागलेलें, धुरानें बाधलेलें, खराब जाहलेलें दाका ४ ४४

[धुर+कट प्रत्यय] —क्रिवि अस्पष्ट तऱ्हेनें, असंदिग्धपणानें, अधुक (दिसणें)

**घुरकटणें**—अक्रि धूर लागणें, धुरकट होणें, धुरानें खराब होणें, मळणें [धुरकट]

**धुरकटाण**—स्त्री धुरकट वास [धुरकट+घाण]

**धुरकटाविणें**—उक्रि धुरकटण्यास लावणें, धूर देणें

**धुरकापरी, धुरकापुरी**—स्त्री एक प्रकारचें जाळें धूरखपूर पहा 'तळनदीत चोळी जाई फाडुन धुरकापरी।'—प्रला १४२ 'मदनपुरानें उरीं क्चुकी धुर कापुरी दाविली।'—प्रला १०२ [हिं कपरधूर]

**धुरट धुरटणें, धुरटाण**—धुरकट, धुरकटणें, धुरकटाण पहा.

**घुरटेजणें**—अक्रि धुरकणें 'धुरटेजेना धूमकल्लोळ।'—एभा २८ ३४२

**घुरत**—स्त्री (व) १ स्मरण, आठवण २ धोरण, शहाण पण [स धूत, धूर्त]

**घुरतावा**—पु १ धूर्त बुद्धीनें तर्क करणें, अनुमान काढणें, अटकळ, अदाज (क्रि० बाधणें, धरणें) 'अधळा धुरतावा बाधतो' धुरताव्यानें चालतो २ धूर्तपणा, शहाणपणा 'अगी धुरतावा असावा' ३ लक्ष, काळजी, चित्त, नजर इतर अर्थी धुनावा पहा [स धूर्त]

**धुरंदळ**—न धुराचा लोट धुराटी [धूर+दळ]

**धुरंधर**—वि १ (ल) शहाणा, हुशार, निपुण, पूर्ण प्रवीण, उत्कृष्ट रीतीनें योग्य, तरबेज २ (व्यापक) उमदा, भव्य, सुरेख, टुमदार, उत्कृष्ट (पशु इमारती, पिकें, जमीन देश इ०) ३ राज कार्यादि व्यवहाराचा भार मुख्यत्वें ज्यावर असतो तो 'होईल मुख्य सभारी। राजा दिधलें धुरधरी।'—गुच ४१ ११ ४ दीर्घ, प्रचड, थोर 'गौप्यरूपें असती गुरु। ठाव असे अगोचरु। अनु ष्ठान धुरधरू।'—गुच १७५ [स धुर्+धृ=धरण]

**धुरधुरणें**—क्रि पुढें येणें, अग्रभागीं असणें 'आणि हिंसा विषय पुढारी। कुकर्म सगें धुरधुरी।'—ज्ञा १५ १७२ [स धुर्+धृ-धरणें]

**धुरपण**—न धूर निर्गम (जसें—जळत्या लाकडाचें) धूर निघणारें द्रव्य (जसें—ओली लाकडें इ०) [धूर]

**धुरपणें**—अक्रि धूर करणें, धूर देत जळणें (लाकूड इ०), धुमसणें [धूर]

**धुरपतगौरी**—स्त्री (धुमसणारी गौरी) सदा चडफडणारी, खडखडणारी, त्रास देणारी (मुख्यत्वें) स्त्री

**धुरफोड्या**—पु खाणींतून दगड काढणारांची जात व तींतील व्यक्ति, वेलदार, मुण्ग्या

**धुरमार**—पु धुरी, धुरी देणें 'बालारिष्ट पचारी। धुर मार पीडा करी।'—दा ३ ७ ३७ [धूर+मारणें]

धुरमुरचें—क्रि (गों) धुरमुरचें पहा.

धुरला–ळा—पु धूळ, माती (बारीक) रस्त्यावर जमलेली, उडालेली धूळ •मरणें–पाणी पडल्यानें धूळ जमीनीवर बसणें [धूळ]

धुरघट, धुरघटणें, धुरघटाण—धुरकट पहा

धुरड—स्त्री (कों) धूर होणें, दाटणें [धुर+अड प्रत्यय]

धुरघड, धुरघडणें—(धुळीनें) धुळवड पहा

धुरघडा—पु वर उडणारी अथवा रस्त्यावर दाट बसणारी धूळ धुळवरा, धुळोरा पहा

धुरपणी—न धुरकलेलें पाणी [धुर+पाणी]

धुरवळा—पु पदार्थावर बसलेला कर धुरवडा पहा [धुरोळा]

धुरसणें—क्रि अप्रमार्गी ठवणें 'जेवीं धुरसोनि दिठी। धूर रणामाजा उगी।' –एभा ३४०१ [स धुर]

धुरसा—पु अग्रभाग [स धुर]

धुरळणें—उक्रि धुळीनें युक्त करणें, शिपडणें, फवारे उड विणें, पसरणें, फेकणें (धूळ अथवा तसेंच हलकें द्रव्य) 'सम खडीला पचवीस पायथा धूळ धुरळली, रात धुरळला' [धूळ]

धुरळा—पु धूळ, धुरला पहा 'तों बहुलक्ष यूथपति आले गगनीं भरला धुरळा।'–मोरामायणवचनी १५५ •देणें–धुरळणें 'कापाचे रोपास चिमटगी देऊन धुरळा दिल्यावर पाणी द्यावें '–शेतकी–शतकरी ३४ •घालणें–(डोळ्यात) धुळ घालणें, भुरळ पाडणें 'निजबळें मग वोढिले धुरळ घालुन।' –देप ९२ ३

धुरा—पु १ धुर पहा २ गावची शेताची हद्द, सीमा, बांध ३ सीमेवरील वस्तु पदार्थ 'गावचा धुरा हा धोंडाच ' ४ (ल) ठराविक काळ, नमलेली मर्यादा, आयुष्य 'ऐशीं नव्वद वर्षे झाली असुन नाहीं भरला धुर।' –पत्रा ११३२७ 'रोखयाचा धुरा,' 'धुरा भरला,' धुऱ्याच तीन हप्ते बाकी राहिले '५ मुदती वा शरगली हप्ता ६ मर्यादारक्षक 'समीप वनदुरा। ते म्हणें भक्ति क्षेत्रिचा धुरा।'–ऋ ८७ ७ आघाडी 'धुरा निजशस्त्र देऊनि त्यागी।' –एभा २८६३३ ८ (व) पाठीचा कणा तापानें तुझा धुरा उघडा पडला ' ९ मुख्य पुढारी, सेनापति थोर, श्रेष्ठपुरुष 'मुदलाची धुरा।'–उषा १६०५ मुख्य धुरा म्या मारिल्या।' –एभा ११ १३८६ पुण्याविषयीं पाठिमोरा। साधु सतां पाहुनि दुरा। तया आपणचि दिसे धुरा। पृथ्वीमध्यें।'–सिस ४५ १० गाडीचा आख, कणा ११ जू जोखड, गाडीचा पुढला दांडा धुरी पहा १२ (ल) जोखीम, जबाबदारी, मुख्य भार [स धुर–रा]

धुरा—पु (तिरस्कारार्थी) (कु) धुरधर पहा [स धुर्य–धूर]

धुराटी, धुराड–डी—स्त्री १ धुराचा लोट, ढग २ (धुरामुळें) काळोखी, अंधार, अंधुकता ३ (सामा) धुरकटपणा

धुराड—वि धुराच्या, जोखडाच्या बाजूस अधिक जड (गाडी) 'गाडी धुराड आहे '

धुरांडखुटी—स्त्री धुरा (गाडीची)

धुराडी, धुरांडी—स्त्री (कों) १ गाडीचें जोखड २ ज्यावर जोखड ठेवतात ते दोन उभे दांडे, प्रत्येकीं शिपाई

धुराडें, धुरांडें—न १ घरातील धूर बाहेर पडण्यास भाडयाला, भिंतीत ठेवलेलें भोंक, धावें २ धूर जाण्यासाठीं केलेला नळ, चिमणी [धूर+आड प्रत्यय]

धुराणी—स्त्री (कों) जोखडाच्या शेवटाकडील छडी, शिळ [धूर+आणी]

धुरावणी—धुरवणी पहा

धुराविणें—उक्रि धुरकटाविणें पहा

धुराळा—पु धुरळा पहा

धुरी—स्त्री धूर १ पायाचा शिरदळ, पाउलाचा वरचा भाग २ जाडयाचा, वाहणेच्या पुढील भाग, धूर ३ गाडी, नागर ह०ची दांडी, धूर, धुरा ४ गाडीवान, सारथी बसण्याची जागा (क्रि० बसणें) 'रथीं राजा धुरसि वाहुक।' –कथा १११०३ ५ भार, जबाबदारी 'तैसेनि त्याग स्वीकारी। वाहता इंद्रियांची धुरी।'–ज्ञा १८५०५ 'ह्या राज्यशकटाची धुरी पूर्वीप्रमाणें आपल्या अंगावर घ्यावी '–चद्र २०१ [सं धुर्]

धुरी—स्त्री औषधी द्रव्यें अग्नीत घालून जो धूर करतात तो (क्रि० देणें) 'प्राति हिताहित न कळें द मोहुनि मानसा धुरी तीतें।'–मोशाति ३७८ [धूर] •देणें–(ल) १ भोंदणें, ठकविणें, छकविणें, फसविणें २ गुन्हा कबूल करून घेण्यासाठीं, शिक्षा देण्यासाठीं मिरच्या इ० जहाल पदार्थांच्या धुरावर माणसाला ठेवणें, त्याच्यावर धूर सोडणें •घालणें–बांळतीणीस वावडिंगाचा अथवा कापाच्या–लसणीच्या पातीचा, ओव्याचा धूर देणें धुरी–पु (मुलस) अंगारा लावणारा

धुरी—स्त्री (गो) वाघाची वाट धाड पहा

धुरीण—वि १ प्रवीण धुरंधर पहा २ नायक मुख्य 'त्या सभेचा धुरीणाचा महत्त्वाचा खरा, पण स्पष्ट निर्दिष्ट नाहीं असा हुद्दा असतो '–इमू २७८ [स]

धुरुई—स्त्री नागर –चा बैल–पु नागराचा बैल

धुरू—पु १ जकातीकडील एक अधिकारी २ एक जात व तींतील एक व्यक्ति

धुरू—पु १ ध्रुव तारा 'ता धीर सत्त्वाचा महामेरु। अढळ पदीं जैसा धुरू।'–हरिश्चंद्र (नवनीत १८३) २ उत्तानपादपुत्र, ध्रुवबाळ 'धुरु ऐकरू वापुडे दैत्यवाणें।'–राम ११७ –क्रिवि

चिरकाल, कायम, अखड 'कुंभपाक्री वस्ती करू। होय धुरु कुळेंसी।' -तुगा २८६६ [स ध्रुव]

धुरे—वि अग्रगण्य, श्रेष्ठ 'तुका म्हणे इच्छा धुरे। ऐसी धुरे हे विठ्ठले।'-तुगा १०५३ -क्रिवि पुढें, प्रा रयानें 'ते बुद्धि धुरे करूनी। कर्म करिती चित्त देउनी।' -ज्ञा ५ ६१ [धुरा]

धुरें—न लाकूड धूर निघणारे लाकूड 'तेथें निवडेना धुरें कीं चंदन। तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं।' [धूर]

धुरेपटक—न आउताचा दाडा व जू आवळण्याची दोरी

धुरेकट—न जू व गाडीच्या दाडया एकत्र आवळणारी दोरी

धुरेकरी—पु १ धुरेवर बसुन गाडी हाकणारा, सारथी २ नागर वगैरे आऊताची जाखडाजवळची जोडी [धूर+करी]

धुरोहा, धुरोळा—पु हवेंतील, रस्त्यावरील धूळ [स धूलि]

धुरोडा—पु १ धुराचा लोट २ धुराडें पहा

धुरोळें—न धूर जाण्यासाठीं छपराला केलेले भोंक, धुराडें [धूर]

धुर्ताई, धुर्तोगा—पु धूर्ताई पहा

धुर्य—वि धुरधर पहा

धुऱ्या—वि. १ धुरेकरी पहा २ चिपळ्यापासुन सुमारें पाच पुरावर भोंक पाडून एक फूट लांबीचें लाकूड बसवितात तें -बद लापूर २८७ धुऱ्यावर ठेवणें-बसविणे-(ना) जाणून बुजून दुर्लक्ष करणें उपेक्षा करणें [स धूर्-रा]

धुलाई—स्त्री वस्त्रें धुण्याबद्दलची मजुरी धुण्याचें माल, धुणावळ [धुणें हिं]

धुळ—पु (गो) धूळ

धुव—न धूर 'परीधुकेलें धुपधुपी माडें। धुवें थिकटें दिग्मडळ।'-एभा ० १७२ [धूर]

धुवट—वि १ धुतलेलें, कोरें नव्हे असें (वस्त्र) २ धुतलेला पारोसा नव्हे व धारण्यास उपयोगी ३ धुतलेला, मळकट, घाण नव्हे असा 'एखादा धुवट फडका असला तर या' ४ पवित्र कारक, शुद्धिदायक 'ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें। वर्णी वर्णे।' -ज्ञा १८ १०१७ ५ निर्मल, पवित्र 'सम्या मल भला विधुल्लल तुझ्याचि मनमा धुवटा।'-मोसभा ५०० ०घडीचा-वि स्वच्छ आणि घडी घातलेला परीट घडीचा, न वापरलेला, न मळलेला (कपडा)

धुवडी—स्त्री (राजा कु) धुतणी ध्वाडी पहा

धुवण—न तांदूळ इ० ज्यात धुतले आहत असें पाणी, धुण 'धुवण दळन घालें भरून। कीं अन्नपात्रें ऐरावत।'-ह ४ २० [धुणें]

धुवणें—उक्रि (काव्य) क्षालन करणें, स्वच्छ करणें धुणें पहा [स धावन, प्रा धुवण]

धुंवता—वि (गो) फिरता

धुवप—न (गो) १ धुणें २ धुणावळ -क्रि धुवणें पहा

धुवर—वि (गो) धुकट, धुराचा

धुंवरी—स्त्री (गो) १ धूर निघण्याची शेगडी २ धुरासाठीं केलेला जाळ ३ धूर

धुंवरें—वि धुराचें लाकूड ०नक्षत्र-न (गो) धूमकेतु

धुववणी—न धुण्याचें पाणी धुवण पहा [स धुणें+पाणी]

धुंवा, धुवा—पु १ मोड, पराजय, पळापळ (सैन्याची) २ फाकाफाक, पांगापांग, वाताहात, नाश, विध्वस, धुमा (क्रि० करणें, उडवणें, काटणें, उखाडणें) धुवाधाण-स्त्री धूळधाण पहा [धूम]

धुवा—पु (व) धूर [स धूम, हिं धूआ]

धुवा—वि धुवट, धुतलेलें, स्वच्छ 'धुवा-रेशीम-सुत-दाळ तांदूळ-साखर' 'साखर पिठी धुवा'-ऐरापु ५ ३०५.

धुवाटी—स्त्री (महानु) धुणें 'कर्म मागें धुवाटी। आघा रैली ब्रह्मयाची हटी।'-भाए ६७१

धुवाडी—स्त्री (माण) धुतणी, ध्वाडी पहा [स दुहित्री-धोडी?]

धुवाधार—स्त्री १ जोरानें आणि पूर्णपणें स्वच्छ करून नेणें, सफा करणें (मुसळधार पावसाप्रमाणें) २ (ल) लुबाडणें नाग विणें बुचाडणें उघडा करणें [धुणें+धार] -क्रिवि धुवून जाईसें, धो धा (मुसळधार पाऊस पडणें)

धुवार—स्त्री धूमयुक्त, वाफा निघणारें, धुरानें व्याकूळ 'आधींच द्रव्यें धुरमुरी। वरि परिवडिजती मोहरी। जियें घेतां हाती धुवारी। नाकेंतोंडें।' -ज्ञा १७ १४६ धुवर पहा

धुवारोटी—पु कृपण, चिक्कू, कजूष भाकरी पाण्यात बुड वून तें पाणी पिणारा छायारोटी पहा

धुवा साखर—स्त्री धुवून स्वच्छ केलेली साखर 'ठाकु नियां धुवासाकर। गुळ कां व्हावा प्रियकर।'-अफला २

धुवाळो—वि (गो) डोहळा पहा

धुवो—स्त्री (गो) मघा (नक्षत्र)

धुव्वा—धुवा पहा

धुव्वाधार—स्त्री (व) अग्नीवर तूप टाकून धूर निघाला म्हणजे तो अग्नि अशुद्धीकरितां पत्रींतून फिरविण्याचा विधि [स धूम-धारा]

धुशर—न धुका, धुमधी धूर 'हरिचदेंमीं तत्पर। नभें माझ्या मानी धुसर।' -दा २ ७ ३२ 'परिसेव धुसर उपरती।' -वेसीस्व १ ५७ धुसर पहा [स धूमर]

धुशा सा—पु एक लोकरीचें वस्त्र, घोंगडी, पांघरण्याची पांवळी, ब्लँकेट, धुसा पहा [हिं धुस्सा]

**धुदरा**—वि. काळा या वर्णाचा अतिशय दर्शक प्रत्यय; अत्यंत (काळा). जसें–काळा धुदरा. दुस्स पहा. [सं. धूसर?]

**धुन**—(महानु) धस्स पहा. 'तैसी मासांजीवें धुन गेलें।' –शिशु १२५.

**धुमकट**—स्त्री नामधूम; वाताहात.'ह्याच पोरट्यानें आमच्या चळवळीची धुमकट केली.'

**धुमकाफुसका**—वि. अशक्त; लेचापेचा; हलका; निर्जीव कमजोर; नादान (मनुष्य, कपडा, दोरा, भाषण, कृत्य) **धुसकी-फुसकी**–नअव. व्यंगें; दोष; वर्मे; उणीदुणी. (क्रि० काढणें). [धुमका द्वि]

**धुमधुम**—स्त्री. १ कुरकुर; रागाची जळफळ; धुमफुसा २ ठसठस; वेदना (जखम, फोड इ० यांच्या). ३ सर्पाचें फुसफुसणें. ४ रुखरुख, काळजीमुळें होणारी अस्वस्थता. 'रात्रंदिवस जिवास धुमधुम होऊन एथें हें पक्वान्न खाणें नको.' –छन्ने–स्वापनीति.

**धुमधुमगी**—स्त्री. धडपडणें; ठसठसणें; ठणकणें; फुसफुसणें इ० [धुमधुमणें पासून नाम].

**धुमधुमणें**—अक्रि. १ ठुमठुमणें; ठणकणें,वेदना होणें (जखम, फोड यांमध्यें). २ कुरकुरणें; कुरबुरणें. धुमफसणें पहा. ३ रागानें फूत्कार सोडणें. ४ आतल्याआत (मनांत) चरफडणें; जळफळणें 'क्रोध महिषासुर केवळ। काम वेताळ धुसधुरित।' ५ जोराचा श्वासोच्छ्वास टाकणें, घेणें. 'देहास करितां स्पर्श सहज सर्वांगीं श्वास धुसधुशी.' –प्रला २५२. [ध्व धुम! धुस!]

**धुसकुस, धुमफुस**—स्त्री. कुरबुर; चडफड, तडफड, उघड उघड होणाऱ्या भांडणाच्या पूर्वीची बोलाचाली. 'रघोजी रेसि हेंदर्शी धुसधुशी करूं लागला' –विवि ८.७.१२५.

**धुमफसणें – धुसफुसणें**—अक्रि. १ बोलाचाली होणें; उत्तरें–प्रत्युत्तरें देणें; मारेळीवर येणें. २ धुमसुसणें; जळफळणें. 'गोदीनें धुमफुसत येऊन धाडकन आईपुढें आंग टाकलें.' –मोर ३३. [धुमफुस]

**धुमसणें, धुसमुसणें**—अक्रि. धुमसणें. १ स्फुंदणें; हुंदके दाबण्याचा प्रयत्न करून रडणें. २ चरफडणें; कुरकुरणें, आतल्याआत रागावणें, मुसमुसणें. 'समुद्र सदा सुप्रसन्न। योगी सदा प्रसन्न वदन। केव्हांही धुसमुसिलेपण। नव्हे जाण निजबोधें।' –एभा ८.४२. [ध्व]

**धुममुस**—स्त्री. १ कुरकुर; धुटधुट; चरफड. २ तोंडातोंडी बोलाचाली; झटापट 'घरात कारभार पाहण्याविषयीं धुसमुसी चालल्या.' –विवि ८ ९ १७०. [ध्व.]

**धुमर**—पु गुलाल, बुक्का इ० उधळावयाचें द्रव्य; सुगंधी द्रव्य, धुशर

**धुसा**—पु घोंगडी; पांघरण्याचें वस्त्र धुशा पहा. [हिं. धुस्सा]

**धुस्कार**—पु. फूत्कार (सर्पाचा, रागावलेल्या माणसाचा). (क्रि० टाकणें; सोडणें; देणें). [ध्व धुस]

**धुळ**—धूळ पहा. [सं. धूलि] ०कट–घट–वि. धुळीनें भरलेला; मलिन झालेला ०धाण–स्त्री. दुर्दशा; धूळधाण पहा (क्रि० उडविणें). 'जो प्रकटतां अधर्मवर्गी। करी धुळधाणी वृत्तीची।' –एभा २३ १०८. ०धुळ–वि. धुळीचा; धुळीनें भरलेला. 'धुळधुळवाणी ममता। ठकमकोन पाहाय। माझा वेडा तमता योगी।' –भज ४७. ०पट–स्त्री. १ दुर्दशा; नाश. (क्रि० होणें; उडणें; करणें). २ फजीती. 'या पंडितानें सर्व पंडितांची धुळपट करून दिली.' ०पट्टी–स्त्री. खरडपट्टी; ताशेरा. (क्रि० काढणें). [गु. धुळपट्टी=धिक्कार] ०घट–धाड–स्त्री. १ धुळीनें मारलेली जागा. २ धूळ. [धूळ] ०घट–स्त्री. ज्या जमीनीवर उन्हाळ्याच्या तापानें खाऱ्या पाण्याचा मिठासारखा पांढरा पापुद्रा येतो व जमीन पांढरी भुरकट दिसते ती जमीन, खाऱ्या जमीनीचा एक प्रकार. –कृषि २११. ०वड–वडी–स्त्री १ होळीनंतरचा धूळ फेकण्याचा दिवस; फाल्गुन वद्य प्रतिपदा. २ या दिवशीं करावयाच्या धूळ फेकणें इ० गोष्टी, खेळ. 'आज धुळवडीस कोण गावास जातो!' ३ (कु.) रंगपंचमीचा दिवस. ४ धुळीची जागा.

**धुळवडणें**—उक्रि. १ धुळवडीच्या दिवशीं चिखल, माती एकमेकांच्या अंगावर टाकणें २ (सामा) धूळ फेकणें; धुळीनें मारणें. ०रा, धुळारा, 'धुळोरा–पु बारीक माती; धूळ (आकाशांत उडणारी, रस्त्यावर दाट पडणारी). **धुळवाड, धुळवाहणें**–धुळवड, धुळवडणें ०वाड–डी–धुळवड पहा. 'परागें धुळवाडी खेळिजे। जाउळेयाचेनि पाणिअें सिंपिजे।' –शिशु २७५. ०वाफ–स्त्री. पावसानें धुरळा बसला नाहीं त्यापूर्वीं जी पेरणी करितात ती.

**धुळा**—स्त्री. (माळवी) धूळ.

**धुळाप**—स्त्री. (गो.) १ धुराळा, धूळ. २ पाऊस पडण्यापूर्वी ज्यात बीं पेरून ठेवतात असें शेत [धूळ]

**धुळारा**—पु धान्यानें उडालेली धूळ; धुराळा. 'अविद्येचे धुळारे उठती।' –पांप्र ८.५१.

**धुळाक्षर**—न १ लिहिण्यास शिकताना पूर्वी मुलें धुळपाटीवर जीं काढीत असत तीं अक्षरें. २ धुळाक्षरें (श्री पासून ज्ञ पर्यंत), अंक इ० [धूळ+अक्षर]

**धुळी**—स्त्री. १ माती; धूळ. 'अंकुरें घेऊनि ते धुळी। लाविली माळीं आपुल्या।' –द्व १८.५६. २ (ल) नाश 'केली संसाराची धुळी।' –दावि ४०३. [धूळ] **धुळिकोट**–पु मातीचा कोट, परीघ. 'जें जिणारें धुळिकोट।'–माए १९४.

**धुळीवरचें सारवण**—न. (ल) अस्थिरता; अशाश्वतता; पाण्यावरचा बुडबुडा. (धुळीवर सारवण बसत नाहीं यावरून)

धुळाग धुळोरा धूं—पु धुरळा 'तैसा धुळोरा अत राळों। सत्यलोकुवर्न्ही।' –शिशु ५४२ 'उपजेल मायचा धुळोरा। माजी नोळखिती यरयरा।' –मुआदि २८ १०९

धू—स्त्री (ना) धूर 'हें अमो दीपाचिय मिढी। अवघड धू आर्थी।' –ज्ञा १८ ७८० [स धूम हिं धुआ]

धू—स्त्री (कु) मुलगी 'एक होती ऊ तिला झाली धू' [स दुहितृ प्रा धूआ]

धूइजणें—(जुनें रूप) धुणें पहा 'सुधाकराचा ख़ादवखाली। धूइजती कापुराची सुभार्ळी।' –शिशु ६२२

धूजड—वि (ना) बैलगाडींत पुढच्या बाजूस ओझें फार झाल्यामुळें बैलाच्या मानेवर जिचा भार पडला आहे अशी (गाडी) [स धुर्‌=जू+जड]

धूइ—स्त्री एक वनस्पति

धूड—न १ अवाढव्य, अजस्र माणूस २ जगी प्रचड साप, जनावर इ० 'असुरा काळ भासे विकाळ पुढें। पसरी मुख एक चाविते धुड।' –तुगा ४७८ ३ मोठें झाड (विशेषत पाडलेलें) ४ लाकडाचा मोठा ओंडा, खडक इ० ५ (खा) शेतातील मूळ खड –भाग ७१ ते ४ [स अभ्युद्र?]

धूडधूस—धुडगूस पहा 'नाटकगृहात धुडकूस घालावा' रास्सपायर नाट्यमाला तुफान प्रस्तावना ४०

धूण—न १ तांदूळ धुतलेलें पाणी, धुवण 'नाना कावाड वाढविलें। ना तरी तकचि गुसळिलें। अथवा धूणचि सेविलें। साव धान।' –दा ६ ७ ३ २ डाळ इ०चें पाणी पाणचट आमटी, वरण [धुणें]

धूत—वि १ धुतलेलें २ स्वच्छ, साफ केलेलें जोरानें निप टलेलें 'अति अढळ सम्यग्धूत वाणी।' –एभा ३ ५२७ ३ धुन्न वधित थरथर कापणारा (भीतीनें) हलणारें कापणारें धुत पहा [स] ०वस्त्र—न सामान्य सोंवळ्याच्या उपयोगी, धुवून वाळविलेलें वस्त्र

धूत—उद्गा (ना) छत् हुडुत् धिक्कारदर्शक उद्गार [ध्व]

धूत्कार—पु फूत्कार (सापाचा) (क्रि० टाकणें देणें; करणें) [ध्व स]

धूधू—पु धुधुकार जाग करण्यासाठीं वानवयाचा ध्वनि धुधु पहा म्हणऊनी धू धू करी घडनी। जागें करी जननी त्या ग्गर घ्यायला।' –आकृ १३ [ध्व]

धून—स्त्री १ लांबलेला घुमणारा ध्वनि, गुणगुण झंकार (वाद्याचा किंवा लांबच्या सगताचा) २ प्रतिमिश्रित ध्वनींचा एक शब्द 'हा शुद्ध सरंग नव्ह त्यांत किंचित गग्याराची धून भासत' ३ नादांत गुणगुण घुणघुण (क्रि० निघणें उठणें) [स ध्वनि]

धून—स्त्री (विणकाम) कापड गुडाळण्याचें चौकोनी लाकूड

धूप—पु १ धूर देणारा ऊद इ० सुगधी पदार्थ 'नाना धूपाचा अग्निप्रवेशु।' –ज्ञा १६ १०७ २ ऊद इ० सुगधी द्रव्याचा धूर हवा स्वच्छ व सुगधी करण्यासाठीं धूप जाळतात ३ (सामा) उदबत्ती ही पूजेच्या वेळीं लावितात –स्त्री सूर्यप्रकाश, ऊन [स धूप्] ०घालणें—१ (झपाटलेल्या माणसाच्या अगातील) भुतानें बोलावें म्हणून त्याच्या पुढें ऊद जाळणें २ (ल) मोठ्या नम्रतेनें अजीजीनें आर्जवानें विनति करणें, प्रार्थना करणें (एखाद्यास–त्यानें बोलावें म्हणून) ३ (अकरणरूपी प्रयोगासारखा) न जुमानणें मर्जीप्रमाणें न वागणें ०दाखविणें—चाळविणें झुलविणें काहीं न देणें सामाशब्द– ०आरती—स्त्री (देवापुढें) धूप दीप इ० ओवाळणें (प्र) धूपारती ०काडी—स्त्री धूप चोपडलेली काडी उदबत्ती, उदकाडी [स धूप+काडी] ०घाल्या—वि एकसारख्या कलागती लावून भाडण चालू ठेवणारा, कळलाव्या [स धूप+घालणें] ०दीप-वात—पुस्त्री धूपआरती पहा ०साळा—स्त्री एक झाड ह्यापासुन लोबान काढतात

धूपणें, धूपविणें—क्रि धूप लावणें, देणें, धूपानें सुवासित करणें 'तदुपरि सकळें हीं मदिरें धूपवीलीं।'–सारुह ६ १३ [धूप; हिं धूपना]

धूपित—वि धूपानें सुवासित केलेला [स]

धूम—स्त्री १ धाव दौड धावेत पळ (क्रि०मारणें टाकणें) 'धाट चाले गाई गोपाळांची धूम। पुढें कृष्ण राम तया सोयी।' –तुगा ३? २ (ल) उत्सुकता, धाडस धैर्य, साहस ३ चैन, चगळ रेलचेल अतिशयता (हा शब्द फार व्यापक अर्थानें वापर तात) आंब्याची–लाडवाची–तुपाची–उदमाची–धूम ' 'पाव सानें धूम केली ' 'पेंढाऱ्यांनीं मुलखात धूम माडली ' 'क्षणभर पतोनी गेल म्हणजे पोरें धूम माडतात ' 'दारूपाची अथवा चोराची धूम ' 'पाहुण्याची धूम ' 'गाण्याची–नाचण्याची–खेळण्याची–धूम ' ४ हल्ला गर्दी एकदम हल्ला उपसून आमच्या वर धूम केली ' –वप्रासाग ९७ ५ सहार घडाळी; दगा; गोंधळ गर्दी गडबड 'हरि वरिष्ठुरीं पाखडीं करि ता अतुल प्रभाव करि धूम। –माशल्य २ ५० –क्रिवि दडाक्यानें झपा-ट्यानें, तडाख्यानें जोरानें कांहीं विचार न करतां 'पाऊस धूम पडता धूम काम चालतें जमीनीनें धूम माण। मरू लागले तो धूम लोकांस मारला–तोडला–दिल्या दना ' धूम फौज पळाली–घोडा निघाला–टाकाला सुटल्या ' [हिं] ०टाकणें–पळ काढणें सु वाल्या करें ०पाडणें–पाणी, बर पारणें कसा गीत लागणें (भाराप मर्यादा, शक्ति, धाडस इ०) एका धुमा वरच्या (ल्व इ०)–एका घावच्या अंतरावर असलेला ०धडक—क्रिवि धीटपणानें झपाट्यानें, सपाटपानें, दवाख्यानें, रगडून

कचकावून (जागें, करणें, बोलणें) ०धडाका-खा-पु १ भरा टयाचा, जोराचा, सपाटयाचा, तडाक्याचा, व्यापार, कार्य 'प्रपच अवघा धूमधडाका।' -टिक १७१ २ (सामा) ओरडणें, दण दणणें गर्जना करणें एखादा मोठा गडगडा, गभीर घुमणारा आवाज, गोंगाट (क्रि० करणें, लावणें मांडणें, घालणें, लागणें) 'तोफांचा धूमधडाका' ०धाम-स्त्री धामधूम, गडबड, आरडा ओरड -घाग्रे १८३ [हिं] ०योनि-पु मेघ

धूम—स्त्री १ गाण्यात पखवाज, मृदग, संबळ इ०कांचा निघ णारा सर्जे सूर, असा सुर निघण्याचें स्थान, वाद्याचा असा अव यव धुमा पहा २ गर्जना (तोफांची, सिंहाची) [ध्व]

धूम—स्त्री (कु.) मळणीच्या वेळीं खाण्यात दावण अडक विण्यासाठीं एक वाणेळें विणलेलें वेलीचें कडें

धूम—पु. धूर, वाफ 'तोय तेज धूमु। यया वायूसीं संगमु।' -ज्ञा १८ ३०८ [स धूम, मी धूमोंम, लॅ फ्युमुस, प्राज दौम, दौम, जिप्सु दूमै, स्ला दमु दिमु, दुर्लुम्ह=ढग] ०केतु-पु शेंडे नक्षत्र 'गगनीं उगवले त्रिविध केतु। दडकेतु धूमकेतु।' -एभा ३० ५९ केतु [सं]

धूमश—वि धुरकट रंगाचें 'कृष्णांबराचें प्रावरण। धूमश रक्त सुलोचन।' [स]

धूमा—पु दंगा, गडबड, गोंधळ धूम पहा 'आणिक दूत अर्व खर्व। करती धूमा।' -प्रला ९ [हिं धूम]

धूमाकुळ—पु धुराचा समुदाय ऐसी मनबुद्धिकरणीं। समों वती धूमाकुळाची कोंडणी।' -ज्ञा ८ २३१ [स धूम+कुल]

धूमाग्नि—पु मदाग्नि अग्निमाद्य अपचन [स]

धूमादिमार्ग—पु पितृलोकाचा रस्ता, दक्षिणायनमार्ग हा भगाराचा मार्ग आहे याच्या उलट अर्चिरादिमार्ग

धूम्र—पु धूर धूम 'मद मत्सर धूम्रमेळें। एकाचे झाकले डोळे।' -एरुस्व १५ १२४ -वि धुरकट रंगाचा, धुरकटलेला, मळकट काळसर [स] ०पत्र-न (यंत्रें साकेतिक) (धुराचें पान) तबाखू [स] ०पान न १ धुनीवर उलटें टांगून चेऊन धूर पिणें, धूर पोटात घेणें, योग्याचा तपश्चर्येचा एक प्रकार 'गोराजनें धूम्रपानें। साधिती पचाग्नी।' -दा ५ १ २५ २ (साकेतिक) विडी ओढणें, हुक्का पिणें 'धूम्रपान घडू नये।' -दा २ २ २५ ०मार्ग-पु धूममार्ग पहा १ पितृयाण, नरकाचा रस्ता याच्या उलट अर्चिरादि तेजोमार्ग 'पहिल्या मार्गास अर्चिरादि व दुसऱ्यास धूम्रादि मार्ग अशीं नावें आहेत' -गीर २९२ २ (ल) यातायातीचा कष्टाचा मार्ग

धूर—पु १ जळल्या लाकडातून निघालेला कोळशाचा अश २ गिल्हई, मुलामा (सोनें, चांदी इ०वरील) ३ (ल) ममता, तन्मयता, एकतानता, तल्लीनता 'त्याचा त्या कामात धूर आहे' ४ धुरी 'विद्येचा-मर्दाचा-धनाचा किंवा पैशाचा-अधिकाराचा धूर' ५ एकाच ठिकाणीं फार वेळ बसल्यामुळें किंवा ओझ्याच्या भारामुळें यणारी कळ (क्रि० उठणें, निघणें, लागणें, होणें) ६ तिखट-मसाल्याचे पदार्थ खाल्ल्यानें नाकातोंडातून जे उष्ण भप कारे सुटतात ते 'सुखीं घालिता अतितिखटीं। नाकीं तोंडीं धूर उठी।' -एरुस्व १४ १०९ करपट ढेंकर ७ आकाशाची अभ्रा च्छादित स्थिति, धुकें, मळभ (क्रि० उठणें, निघणें, होणें) [सं धूम्र] ०देणें-दाखविणें-(ल) फसविणें, ठकविणें, चकविणें, 'त्या लफग्यानें त्याला चागलाच धूर दिला' 'धूरा वर धरणें-गाजणें, निर्दयपणें वागविणें छळणें ०निघणें-गुप्त बातमी थोडीशी बाहेर यणें, किंचित् कळणें, -ख ४९३३

धूर —स्त्री १ जोखडाचीं शेवटें प्रत्येकी, गाडीचा, खटाऱ्याचा दांडा, गाडीचा अग्रभाग धुर व जू मिळून होणारा भाग, गाडीच्या दांड्याचा अग्रभाग २ वहाणेचा पट्टा, बुटाचा तोंडाजवळचा पृष्ठ भाग, धुरी ३ पावलाचा पुढील पृष्ठभाग, जोड्याचा कमानीजवळचा पृष्ठभाग धुरी ४ (काव्य) अग्रभाग 'हात पसरू ऐसा धुरें। ज्याचें कल्पाती नसरे।' ५ सग्ह भार 'अमर्त्यक्ष्यालाचें धूर महाबळ धाडिले।' -मोराधनाक्षर रामायण ३७ -वि १ पुढारी, नायक, श्रेष्ठ 'मुख्य धूर रणीं लागल्या हातां। वेर कटक जिंकिल न भुजतां।' -एभा ११ ८८३ धुर अर्थ २ पहा २ प्रमुख, प्रधान [स धुर्] ०पटक-न जू आणि दाड्याचें टोंक याना बांधणारा वेद धुरकट ०करी-पु १ हाकणारा २ अनेक जोड्या असलेल्या औताच्या जोड्यातील जोखडाजवळची, धुरेजवळची जोडी धुरकरी पहा ०काढणें-मार्गदर्शक होणें, पुढाकार घेणें 'मोह नदीची थोर कढाडी। मार्जी समळ जळ प्रबळ धोढी। शितोडा न लागतां धूर मी काढी। परापरथडी तत्काळ।' -एभा १२ ५७७ ०खीट-स्त्री गाडीच्या दाड्याची खीळ धुरखीळ पहा ०जड-स्त्री (ना) धूजड पहा ०पट्टी-स्त्री दाड्याच्या शेवटील आडवी पट्टी

धूरकपूर—न एक प्रकारची जाळी, कापड धुरकापरी पहा [हिं कपरधूल]

धूर्त—वि १ हुशार, कुशाग्र बुद्धीचा, चलाख, चाणाक्ष २ लबाड लुच्चा, कावबाज [स] धूर्ताई, धूर्तावा-पुस्त्री १ धूर्तपणा हुशारी, चातुर्य चाणाक्षपणा २ लबाडी, फसवेगिरी, लुच्चेगिरी [स धूर्त]

धूला—पु दंगा, दगा, गडबड दुला पहा

धूलि—स्त्री धूळ पहा [स] ०प्रक्षेप-पु शितोडा उड विणें, दोषारोप, वाईट टीका करणें [स] ०वंदन-न धुळ वडीच्या दिवशीं धूळ, चिखल टाकण्याचा खेळ [स]

धूव—स्त्री (गो कों) कन्या, मुलगी [स दुहितृ-प्रा धीआ, धुआ] म्हृ० बोले सुने आणि लागे धुवे

धूसार—न भडार, हळद धूसर पहा 'धूसरें सूर्य झाको ळला।' –दावि १०९

धूसर—वि धुरकट, करड्या रगाचा –न १ धुकें, धुंदी 'झाड झाडटें सुन्ला वायो। तेणें धूसर दाटलें।' –मुवन २ ३९ २ धूळ, चूर्ण, धूलि 'वरि बुकियाचें धूसर। उत्तर कस्तुरी केशर।' –शिगा ११९ [स धूसर]

धूळ—स्त्री १ बारिक माती, धूलि २ (ल) गोंधळ, भावा थलेली स्थिति ३ दुर्दशा, नाश विध्वस, पराजय, मोड (सैन्याचा) ४ (सामा) ऱ्हास, नाश, नष्टप्राय स्थिति [स धूलि] ०उडणें–(शेत गाव, मुलुख, घर यामध्यें) ओसाड पडणें ०चारणें–(धुळीस तोंड लावणें) पराभवास चीत करणें, पराभव करणें, मान भग करणें ०फुंकणें–(कमी चारा असलेल्या जमिनींत गुरें करतात त्याप्रमाणें) अनाथ दशेप्रत जाणें, पोटाला न मिळणें **धुळीच दिवे खात जाणें**–मोठया वेअब्रूनें दुस्थितींत भिक्षा मागत फिरणें **धुळीचे दिवे लावणें**–दुर्लौकिकानें प्रसिद्धीस येणें, वाईट कृत्य करून पुढें येणें **धुळीस मिळणें**–समूळ नाश होणें **धुळीस मिळविणें**–नायनाट करणें, रसातळास नेणें 'मराठेशाही मी पार धुळीला मिळविली आता मी खराखुरा सम्राट झालों' –स्वप १३४ **धुळींत रत्न सांपडणें–मिळणें**–अनपेक्षित लाभ होणें अचानक एखादी चागली गोष्ट लाभणें सामासिकशब्द– ०अक्षर–न. धुळाक्षर पहा ०कोट–पु (धुळीचा, मातीचा कोट) वाहेरील तटवदी, मातीचा कोट (किल्याभोंवतालचा) ०दर्शन–न १ हवपाय धुवून तयारीनें देवदर्शन करण्यापूर्वी प्रथम दुरूनच–रस्त्या वरूनच देवाचें दर्शन घेणें, देवाला केलेला नमस्कार २ मोठ्या माणसाची भेट ३ उभ्याउभ्या, जाताजाता भेट, ओझरतें दर्शन भेट 'माझें वृत्त समजून न घेता धूळदर्शनींच शिव्या देऊ लागला' ०दशा–धमासा–धाण–धाणी, धूळपट–पट्टी–स्त्रीपु १ पराजय; पराभव दाणादाण (सैन्याची) 'परी यवनसेनेची जा करीं धूळधाणी।' –विक ७ २ गोंधळ, फजिती नाचक्की (भाडखुदळ, लबाडखोर माणसाची) ३ नाश, भग बिघाड (बेत योजना यात) ४ उध्वस्तपणा, ऱ्हास पडझड (शहर देश यांची) ५ अव्यवस्था धुळीस मिळणें, दुर्दशा 'पोरापासीं सावकारीस हजार रुपये दिले होते त्याचा त्यानें धूळधमासा करून टाकिला' ०धमाया–स्त्री (शहर) यवत्यव दगडधोंडे, फाल्तू गोष्टी पुस्तारी ०पट्टी, पट–स्त्री खडसावणी, खरडपट्टी; ताम डणी (क्रि० काढणें उडविणें माडणें, करणें) [धूळ+पट्टी] ०पाटी–स्त्री धुळाक्षरें गिरवण्यासाठीं वर धूळ पसरलेली लांक डाची फळी दगडी पाटया निघण्यापूर्वी या पाटया प्रचारांत असत ०पेरणी–स्त्री पाऊस पडण्यापूर्वी केलेली पेरणी –कृषि २२३ ०भेट–धूळदर्शन पहा 'लाटसाहेबाच्या धूळभेटीचा प्रसग म्हणजे देशी सस्थानिकाना मोठा आनदोत्सवाचा वाटतो' –केसरी ०वाफ–स्त्री (धुळीत पेरणी) १ पाऊस पडण्याच्या सुमारास अथवा पावसाची पहिली सर पडल्यावर व धूळ पूर्णपणें बसण्या पूर्वी केलेली पेरणी २ अशा रीतीनें पेरलेलें भात इ० [धूळ+वाफ]

धृत—वि धरलेलें, पकडलेलें समासात– धृतधैर्य–निश्चय–सकल्प–सन्यास, धृतोत्साह [स] ०व्रत–वि एकनिष्ठ सकल्पा प्रमाणें वागणारा ०राष्ट्र–पु १ दुर्योधनाचा पिता २ (ल निंदार्थी) जन्मत अध, अधळा माणूस [स]

धृति—स्त्री १ स्थैर्य धैर्य, निश्चय –ज्ञा ६ ३७६ 'मुल्ला धर्में द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला।' –मोवन १३ ७८ २ धरणें, धारणा, जवळ असणें, ठेवणें ३ सत्तावीस योगापैकीं आठवा योग [स]

धृपद—न ध्रुपद पहा

धृव—पु ध्रुव पहा

धृवक—न ध्रुपद 'ध्रुवक कामाद' –दावि १४९

धृष्ट—पु उद्धट दाडगा 'अहा निपट धृष्ट मी प्रभुवगासि का लाजशी।' –कका १६ [स]

धेंक—पु (गो) १ दारा, धक्क दवाजों पण २ ढेंकर

धेंक, धेंकण—पु (गो) गर्जना [ध्व]

धेंकर—पु (गो) ढेंकर पहा

धेंगसों—पु १ (गो.) धमकी, धाक, दम ०धारप–चिडून बोलणें, खेकसणें, दरडावणें

धेड—पु १ एक हलकी जात व तींतील व्यक्ति दक्षिणेंत बहुधा महाराला ही सज्ञा लावितात २ (ल) एक शिवी वाईट कृत्य करणारा 'तू ब्राह्मण आहस कीं धेड!' – प ५८७ ०कचरा–पु (धेडाचें भाडण) (ल) आरडाओरडीचें निकराचें भाडण ०कावळा–पु कावळ्याची एक जात हा अगदीं काळा असतो यास डोमकावळा, महारकावळा असेंहि म्हणतात [धेड+कावळा] ०गा–पु (तुच्छतेनें) धेड ०गुजरा–वि अनेक भाषाची सरमिसळ जींत आहे अशी (भाषा) अनेक भाषाची खिचडी 'पण नित्यक व्यवहार तर असे आहेत कीं मराठा धेड गुजरी भाषा तोंडात बरळण्याचें कारण जें इग्रजीचें ज्ञान त्याचाहि पण त्यास गध नसतो' –नि २३ [धेड+गुजरी] ०वाडा–पु १ धेड लोकाचा मोहल्ला महारवाडा 'धडवाडा वैसनी खाश घेतली आपुल्या भावें।' –तुगा २९६ २ (ल) कज्जाचें भाडण वाचावाची; आरडाओरड (क्रि० माजविणें माडणें) ३ (ल) गोंधळ अव्यवस्था [धेड+वाडा] ०सुगी–स्त्री १ इतर लोकांचें धान्य तयार होण्यापूर्वी धेडांनीं आपलें बऱ्याचें

मिळालेलें बाजारांत विक्रीस आणलेलें, पिकलेलें धान्य (अर्थात तें बाजार भावापेक्षां स्वस्त दरानें विकावें लागतें त्यावरून) २ (ल) अल्पकाळ टिकणारी पण अतिशय स्वस्ताई [धेंड+सुगी]

**धेंड, धेंडें**—न १ अनघड आणि अवाढव्य शरीराचा माणूस धूड 'अनंत ब्रह्मांडें। एक्या रोमीं ऐसीं धेंडें।' २ मोठा, प्रसिद्ध माणूस, श्रेष्ठ प्रतिष्ठित माणूस धर्डे प्रस्थ, मोठा विद्वान, वजनदार माणूस, विद्या, पराक्रम, शौर्य इ० मध्यें श्रेष्ठ 'अर्जुना दमणें धेंडें। प्रज्ञ पणरेसीं बुडे।' –ज्ञा १८ २८९ 'ज्याच्यांत पाणिनी कालिदास . वगैरे असंख्यात धेंडें निपजलीं ' –नि १०३ ३ वेडगळ, अविट माणूस [हिं ढेंढा–ढा=ढेरपोट्या, ढेंड–मूर्ख] म्ह० (गो) धेंड धेंड्गें पाऊस रोइलों, धेंडल्या आवे म्हातारा शेंठे ऊन खातगी

**धेंडरवाळी**—स्त्री (व) करष्टमीपासुन दिवाळीपर्यंतचे दिवस यांत एक एक दिवा दररोज जास्त लावण्याची पद्धत आहे करष्टमी पहा

**धेंडलों**—पु (गो) दिवाळींतील गुराख्यांचा एक उत्सव कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं गुराख्यांची मुलें कृष्णाच्या मूर्तीची डोक्यावरून मिरवणूक काढतात व नाचत घरोघर हिंडतात [धेंडा]

**धेंडशी-सी**—स्त्री एक भाजीचा वेल, दिल्पसत **धेंडस-सें**–न त्या वेलीचें फळ (खा) ढेमसें; दिल्पसत

**धेंडळणें धेंडाळणें**—अक्रि ढाळ होणें ढेंडळणें पहा

**धेंडा**—पु १ (कु हेट) विवाहांत मधुपर्क करतेसमयीं वराच्या शेजारीं दुसरा मुलगा सोबतीस बसवितात तो, पाणजावई २ (गंजिफाचा खेळ) सुरखावरोबरजें दुर्लक्षें पान हुकुम होत असतें तो म्ह० नवऱ्याला मिळेना वाट (कट) धेंडा मागतो वरण

**धेंडा**—पु १ वरातीच्या दिवशीं वधूवरांस खांद्यावर घेऊन कुलदेवतांचीं नांवें घेऊन नवरीच्या मांडवांत नाचतो तो माणूस 'धेंडा नाचवील कृष्णनाथा। रसाळ कथा पुढें आहे।' –एरुस्व १६ १६६ २ धेंडा नाचविण्याचा कुलाचार, प्रकार, नवरा–नवरीस खांद्यावर घेऊन नाचणें (क्रि० नाचविणें) 'धेंडा नाचविला निश्चित। लोंढ सिद्ध जाहलें समस्त।' –ह २४ १७२ म्ह० टाळ गेला मादळ गेला माझा धेंडा नाचू द्या=मनुष्य एखाद्या गोष्टीची वेळ निघून गेली असतां ती करावयास पहातो तेथें योजितात ०नृत्य–न नवरा–नवरीस दोन्ही पक्षाकडील माणसें घेऊन नाचतात तो प्रकार धेंडा नाचविणें

**धेंडा**—पु दौंडी धेंडा फिरवूनि वानरफौजु।'–रामुरा ४७ ११७ ०पिटणें–द्वाही, दवंडी पिटणें

**धेंडा, धेंड**—वि दांडगा मस्त आमची बनी म्हणजे नुसता धेंडा आहे '

**धेंडाळी, धेंडाळी**—स्त्री हगंगळ, हगवण, शौचास वारंवार होणें हा रोग ढेंडाळी पहा

**धेंडो, धेंडा**—स्त्री बायकांच्या दागिन्याचा एक प्रकार (विशेषत कर्णभूषण), तानवड 'कानीं धेंड्या आणिक वेल पाल्या मोत्याचे सर।' –अफला ५५

**धेंडी**—स्त्री (गो कु) नवरीची पाटराखीण धेंडा पहा

**धेंडें**—न समुदाय 'आणि बाह्येंद्रियांचें धेंडें। विधिचेनि दंडें।' –ज्ञा १८ ८३५ [दिंड]

**धेंडवाळी**—स्त्री धोरिन; बोल्ती 'विवाहांतीं धेंड वाळी।' –एभा १० ५६८ •

**धेंडोली-ळी**—स्त्री बलिप्रतिपदेच्या, कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं गुराखी आपल्या गुराच्या भोंवतीं गवताच्या चुडीनें ओवाळतात ती गवताची चूड (गो) धेंडलों पहा

**धेड्या**—पु धेड्गा पहा

**धेंड्या**—पु धेंड याचें तिरस्कारार्थी रूप

**धेणें**—उक्रि धरणें (भूतकाळीं प्रयोग) 'तरि मौन धेलेंचि अर्जुनें।' –गीता २ १६२८ कधीं कधीं ध्येलें असेंहि रूप येतें 'नपुंसकें ब्रह्मचर्य ध्येलें।' –गीता ११३८९ [स धृ]

**धेन**—न (राजा कुण) चित्त, लक्ष, ध्यान पहा

**धेनरा**—स्त्री ध्यानवा पहा

**धेनु**—स्त्री गाय 'नाल्ली हे धेनु हें श्वान। एक शुद्ध एक हीन।' –ज्ञा ५ ९४ [स]

**धेनूधा**—स्त्री गाईची कास, ओटी 'त्वया म्हणेल विति सुरधेनूधा सदसासि दुभशील।' –मोवन २ १००

**धेप**—स्त्री (गो) टांग

**धेपी**—पु (गा.) ढेंकूळ [ढेप]

**धेर**—पु घोड्याचा रंग –अश्वप १ २८.

**धेलापिट**—क्रिवि दशदिशा, हातापिटीं 'आलें रे आलें भणत। धेंसापिटें जालें राउत।' –शिशु ८६६

**धेंकाला**—पु (कु) जुनीं नाटकें ज्यांत होतात अशी जत्रा, उत्सव [दहिं+काला]

**धैप**—स्त्री मोठें पाऊल, लांब टांग धेप

**धैर्य**—न १ धीर, दम, धृति निश्चय, अढळपणा २ धाडस, धडाडी धीर पहा ३ टणकपणा 'पृथिवी साडी जरी धैर्यातें।' –दाव ३९३ [सं] –वि धैर्यवान् 'तरी धनुर्धरा धैया। निर्धे अवधान देईं वा धनंजया।' –ज्ञा ९ ९७ ०भंग–पु निराशा, निरुत्साह हिरमोड, हिंमत खचणें [स धैर्य+भंग] ०शाली–रि सोशीक, दृढनिश्चयी धैर्याचा **धैर्यावा**–वि धैर्यवान्, धीराचा **धैर्यावलंबन**–न (धैर्यावलंबन) निश्चय, धारिष्ट्याचा अवलंब करणें, धैर्य धरणें [धैर्य+अवलंबन]

**धैवत**—पु सा स्वरांपैकीं सहावा स्वर [ स ]

**धो**—उद्गा एक विशिष्ट आवाज (जिनस इ० पडण्याचा) [ध्व] ०कन-कर-दिनीं-दिशीं, धोकरसा-धो ! कर असा, एखादी जड वस्तु खालीं पडताना होणारा आवाज

**धो**—स्त्री गाडीच्या चाकास बसविलेली लोखडी धाव-पट्टी

**धो**—स्त्री खळण्याचें हत्यार —मव्या ६८

**धोक**—न वेड —वदलापूर १३५

**धोक**—वि १ मोठा, लठ्ठ दणकट ( माणूस ) २ मजबूत (वस्त्र) [ हिं धोकड ]

**धोक**—पु (नाशिक) विणण्यास उपयोगी असा न उकललेला सुताचा गुडा, थोक

**धोंकटी, धोंगटी**—स्त्री १ न्हाव्याची-वस्तर ठेवण्याची कातडयाची पिशवी 'पायीं पाउन वाहणा अटकवी पक्षेप्रती धोंकटी। ऐसा नापिक वेष तो धरि हरी दामाचिय सकटीं।' —कीर्तन १ ६७ २ शरीररूपी पिशवी 'ह गुणेंद्रिय धोकटी। वद धातूची निकुटी।' —ज्ञा १३ १०६८ ३ दोन कप्प्याची पिशवी, पडशी

**धोकड**—वि बळकट, धाकट-ड [ हिं ] ०धाकड-वि धाकड धाकड पहा

**धोंकडा**—पु (राजा) (निंदार्थी) अगडबब, लठ्ठ माणूस [धोकड]

**धोंकणार**—वि ( गो ) ( दारू ) पिणारा, ढोंसणारा, सुरा भक्त.

**धोकणी-नी**—स्त्री ( ना ) चिंता तुरतुर, हुरहुर फिकीर 'मला रात्रदिवस परिक्षेची धोकनी आहे '

**धोकणें**—अकि जमणें, गोळा होणें 'धाकें धाकें धोकला रंग अवघा।' —दा १४ ४ १९

**धोकर**—पु ( व ) दगा

**धोकरा**—पु ( गो ) म्हातारा [ गु डोकरा ]

**धोंकसुचें, धोंगसप**—क्रि ( गो ) ( काठीनें ) ढकलणें, ढासणें

**धोका धोंका**—पु १ भीतीचें कारण, भय संकट 'त्या वाटेनें चोराचा, वाघाचा कशाचा काहीं धोका नाहीं ' 'नाना धोक वेढ्ढीच। नाना किंतु मदहाच।' —दा १ १ ३६ २ काळजी चिंता अनर्थाची शंका कुकल्पना 'दिवस सर्वदा भाकून गेला। अनर्थी धोका लागला।' —दा ३ ७ ५९ त्या मार्गानें तू खुशाल जा काहीं धोका वाटणार नाहीं ' ३ आपत्ति ओढवलेलें संकट 'याढर प्रमाण वेढांशी दगा खरें झालें भय पुन्हा मागुता धोका आला। यमयातनचा।' —दा ३ ५ ५१ 'यशवंतरावच्या धोक्यांत मी असताईर होतों ' ४ व्यापारांत तोटा, बूड, दुर्दैवाचा फटका 'त्या व्यापारात मला दोन हजाराचा धोका बसला ' ५ (ल) झोंका [ हिं धोखा, गु धोको ] ०देणें-फसविणें, ठकविणें

**धोका**—पु दस्ता, कापूस पिंजताना तातीवर मारायाचा ठोकळा

**धोकावणें**—क्रि धोका येणें, दगावणें 'स्वहित न घडे जाहील धोकावला।' —दावि ४४० [ धोका ]

**धोकाळ**—पु ( कों ) मोठा धडधड जळणारा विस्तव, प्रज्वलित अग्नि

**धोंगटी**—स्त्री धोकटी पहा

**धोंगड**—वि १ खरबरीत ( कापड, चटई, बैठक ) २ ओबड धोबड, अकुशल, घसमुसळें ( काम, युक्ति ) 'तेथ मी ज्ञाता हे धोंगडी युक्ती। स्फुरे निश्चितीं सूक्ष्म दर्भे।' —एभा २३ २३९ ३ वेडब, अडाणी, असंस्कृत ( माणूस ) 'तीन नेत्र विपकंठ धोंगडा।' —अकक २ —भस्मासुराख्यान २५ 'मी तो महा राजाचा धोंगडसा वाणी।' —दावि ३३२ [ हिं धोकड ]

**धोंगडा, धोंगडें**—न। दणकट, जाडेभरडे कपड; चिरगूट, कापड, वगैरे 'वस्त्र नेसलीसे धोंगडा।' —ममाप १ २ म्ह० गाढी धोंगडा पोटाला तुकडा

**धोंगस**—पु ( गो ) सुरत, संभोग

**धोट**—न धोटा पहा

**धोट**—वि धुवट

**धोटणें**—उक्रि ( कों ) अधाशीपणानें, एकपारखें पुष्कळ प्रमाणानें पिणें ( क्रि० लावणें ) [ ध्व धोट, घोट ]

**धोटनी**—स्त्री ( व ) लोचटपणा

**धोटा**—पु १ अधाशीपणें आणि पुष्कळ प्रमाणानें पिणें; गटगटा पिणें ( क्रि० लावणें )

**धोटा-टें**—पुन १ ( विणकाम ) उभ्या सुतात आडवे धागे टाकण्याचें साधन कापडात आडवें सूत घालण्यास ज्यात कांडी भरून ठेवतात व जें उभ्या दोन्यातून इकडून तिकडे आडवें फेंकतात तें २ गुराना औषध पाजण्याचें नळकांडें 'बैलाला धोट्यानें तेल पाजा ' ३ पोकळ नळा, पिचकारी 'घेमोनी कनकाचे धोटे। सिंपताती एकें जवटें।' —शिशु ६६९

**धोड**—स्त्री ( व ) निबर टणक, कडक; चोंवळा नसलेला धोंड पहा 'रोड वदरीची फाड जोडता वोढविती मुरू धाड ' —अमृत सुदामचरित्र १०

**धोंड**—स्त्री १ मोठा जड धोंडा दगड, रूप माटी शिळा, खडक 'ह दहदुर्गीच धोंड। हृदियग्रीचें बोंड।' —ज्ञा ३ २४२ २ ( ल ) व्यापारांत आलेली बूड ३ सरकारनें लादलेला फार मोठा कर ४ मोठें संकट दुःख ५ बडबडणारी कटकटी स्त्री 'उरावर धोंड-गळ्यावर धोंड-डोक्यावर अथवा माथ्यावर धोंड'

धोंड ' ६ मोठा आळ, आरोप ७ ओझें, भार ' हिंदुस्थान दिवसेंदिवस अधिकाधिक दरिद्री होत असून हिंदुस्थान इंग्लंडच्या गळ्यांत एक मोजड धोंड झाली आहे '—टिळ्या (याप्र) ०डोकीवर चढविणें-देणें-चळविणें, धोंड पडणें, येणें—१ अतिशय द्रव्यनाश होई असें दरवडा इ० संकट प्राप्त होणें 'या व्यापारानें पाच हजारांची मजवर धोंड पडली ' २ एखाद्या मनुष्यावर बळेंच लादणें (काम) ३ कांहीं मागणीविषयीं एखाद्याकडून जुलमानें कबुली घेणें स्वार मिळविणें ०गळ वि दगडमय जींत धोंडे पुष्कळ आहेत अशी (जमीन) ०दिवस—पु धर्मकृत्यास योग्य असा दान तिथीमधला तिथीवृद्धीमुळें येणारा दिवस आकड दिवस ०फूल—न दगडफूल, पावसाळ्यांतील दगडा—लाकडावरची पुलासारखी उगवण ०फोडया—वि १ पाथरवट २ (ल) दगडफोड्या पहा ०भट्टी—स्त्री स्नान केलें नसून स्नान केल्यासारखें दिसण्यासाठीं गंध, भस्म इ०कांनीं आपलें शरीर सजविणें स्नानाशिवाय गंध लावणें (क्रि० करणें) ' यता हा धोंडभटी द्विज करिति सदा तीर्थे वाया पदाचे।' —मसाप ४ ३ १६४ —आगर ३ १० [धोंडा+भट किंवा धोंडभट ब्राह्मण] ०महिना—मास—पु पुरुषोत्तममास अधिकमास, मलमास (या महिन्यात धर्मकृत्यें होत नाहींत म्हणून) ०मार—पु धोंड्यांची मारामारी, धोंड्यांनीं मारणें, खाल्लेला मार, दगडमार ०पाणी—न (चव, लज्जत यण्यासाठीं) ज्यांत ठिकरी विझविली आहे असें ताक, ठिकरी तापवून चरका दिलेलें ताक (निदार्थी) ठिकरीचा वास लाविलेलें ताक, ताकतव [धोंडा+पाणी] ०वाण वायण—वण—न १ अधिकमासात ब्राह्मणांस दिलेलीं वायनें २ दिंड, आंत पुरण घालून उकडलेला कणकेचा गोळा; धोंडा पहा अधिक महिन्यात याचें वाण देतात ३ अधिक महिन्यांतील ब्राह्मण भोजन ०शीर—स्त्री मोठी शीर १ पायाच्या टाचवरची शीर २ हाताची शीर ३ कानाजवळची शीर [धोंड+शीर] धोंडा—पु १ दगड आस्मासि न या तोंडा दावावें नृपपदावरि पडो धोंडा।' —मोकृष्ण ५० २३ २ अधिक महिना हा प्रत्येक अडीच वर्षांनीं येतो ३ अधिक महिन्यात वायनासाठीं ब्राह्मण भोजनासाठीं केलेला कणकेचा पुरण घालून उकडलेला गोळा, एक पक्वान्न ४ (ल) मूर्ख, दगड अक्कलशून्य माणूस ५ कठिण हृदयाचा मनुष्य निर्दय पाषाणहृदयी माणूस म्ह० १ देखला धोंडा घतला कपाळीं=अतिशय चिडखोर आणि आततायी माणसास लावतात २ पावला तर देव नाहीं तर धोंडा ३ धोंडा टाकून पहावा पडला तर आंबा नाहीं तर धोंडा धोंडा लोटणें—घालणें एखाद्यावर मोठें तुफान आणणें कचाटें घालणें धोंडे खणून काढणें—पाया खणून काढणें निर्मूलन करणें, पाळेमुळें खणून काढणें उखडणें काढून देणें एखाद्यानें अजीबात निघून जावें म्हणून हात धुवून त्याच्या पाठीस लागणें धोंडे मारूं लागणें—१ एखाद्यावर चालून जाणें, मारावयास धांवणें २ (उप) वश होणें, वश लागणें धोंड्यासारखीं हात सापडणें—पेचात अडचणींत येणें धोंड्याचे दार काढणें—१ कृपणापासून पैसा, पाषाणहृदयी मनुष्य पासून दया मिळावयास झटणें; अशक्य गोष्ट करावयाचा प्रयत्न करणें २ अनुरूप साधनाचें सहाय्य नसतां मोठ्या युक्तीनें आणि निश्चयानें मोठे उद्देश सिद्धीस नेणें धोंड्यावर धोंडे घालून करणें—द्रव्यादि सहाय्य नसतांना नाना प्रकारचे प्रयत्न करून एखादें कार्य करणें, नाना प्रकारच्या युक्त्या योजणें धोंड्यावर धोंड घालणें—निष्फळ प्रयत्न करणें, उपयोग नाहीं असा गोष्टी करणें धोंड्याशीं कपाळ घासणें—स्वतःस व्यर्थ शिणविणें (मूर्खास शिकविण्यात इ०) हातीं धोंडे घेणें—अतिशय चिडणें, मारावयास उठणें पायावर धोंडा आढून घेणें—एखादें संकट पाठीशीं लावून घेणें पायावर धोंडा पाडून घेणें—आपल्या अंगांत माती पाडून घेणें, स्वतःवर संकट आपत्ति ओढवून घेणें चार ठिकाणीं धोंडे टाकून पाहणें स्वकार्य साधनार्थ अनेक स्थळीं अनेक प्रयत्न करून पाहणें धोंटाळा धोंडा—पु दुसऱ्याच्या पदांत कधींच सापडणारा असा धूर्त माणूस दगड शब्द पहा धोंडाळ—वि १ दगडाळ खडकाळ २ एक प्रकारची काळी जमीन, हींत धोंडे फार असल्यानें आंत पाणी राहू शकतें म्हणून पिकास फार चांगली समजतात धोंडी—स्त्री मोठा दगड, धोंडा धोंड

धोडकारा—पु (गो) एक लहान जातीचा मासा याच्या मस्तकांत तीन दगड असतात अशी समजूत आहे म्ह० धोड काराच्या कपाळांत तीन गुडे (दगड)=(वों) पवसाला पानें तीन या अर्थानें

धोडा—पु (गो हर) कच्चें फळ दोड—डा पहा

धोडावणें—क्रि (गो) टोकणें टोचावणें म्ह० (गो) धोडा वन फणसूल पिकवप=(बदडून फणस पिकविणें) मारूनमुटकून वैद्यबुवा बनविणें

धोडावणी—स्त्री (गो) टोक टोंचणी, टोचावणी

धोंडावणें धोंडाविणें—अक्रि एखाद्यास विशिष्ट काम करण्याविषयीं टोंचणी लावणें बळेंनें प्रवृत्त करणें

धोडी—स्त्री (कुणबी) पुतणी धाडी पहा [स दुहितृ—दुहिता—प्रा धीआ—धूआ]

धोडीं—स्त्री (गो) एक मासळी

धोडी—स्त्री आकार —मनको

धोडो—पु (गो) काकडा पोत पूड

धोड्या—पु एक प्रकारचा पांढरा मासा याच्या कपाळात तीन पांढरे दगड नेहमीं सापडतात असें म्हणतात धोडकार पहा (गो) धोड्यारो

**घोण**—न. १ झाडाचें खोड; सुंधा. २ टोकळा; ओंडा; ढोण पहा.
**घोणका, धोणा-ण्या**—वि. अडाणी; अशिक्षित; गांवढळ; आडदांड. ढोण्या पहा.
**घोणकी, धणकुटी**—स्त्री. (गो.) अति रक्तस्त्राव झाल्यामुळें होणारी मृत्युसूचक वेदना.
**घोणकें**—न. (गो.) ज्या कणसास एक सुद्धां दाणा नाहीं असें कणीस.
**घोणा**—पु १ टोकळा; ओंडा; घोण. २ (कु.) वल्हीं अडकविण्याचा दाडा.
**घोणी**—स्त्री धुण्याची जागा; धुण्याचा दगड. [धुणें]
**घोणी**—न. ज्यांत धुणें धुतलें आहे असें पाणी; धुवण. [धुणें+पाणी]
**घोण्या**—पु. माकडांच्या टोळीचा म्होरक्या.
**घोत**—पु. १ झोत; लोट; पाण्याचा धवधवा. २ आगीचा लोट; झोत. [ध्व.]
**घोत**—स्त्री. ओंजळ; दुप्पट पसा.
**घोतघडीचा**—वि. धुवट; स्वच्छ आणि घडी घातलेला; परिटघडीचा. [धुत+घडी]
**घोतर**—न. पुरुषाचें नेसावयाचें, पांघरावयाचें वस्त्र. (क्रि० नेसणें). 'हातीं देवोनि कन्यापुत्र। नळराय काढिला बाहेर। दीधलेंसे येक धोतर। नेसावया।' –कथा १.९ २९. [सं. धौत्र; सिं. धोती, धोत्यो] ०सोडून नाचणें-मोठा आनंद प्रदर्शित करणें; आनंदानें बेहोष होणें. ०जोडा-पु. एक सलग विणलेली धोतराची जोडी. ०बडव्या-पु. धोतरें धुणारा ब्राह्मण, चाकर; शागीर्द (तुच्छतेनें वापरतात).
**धातरपाडवा**—पु (अप.) दौहित्र प्रतिपदा.
**घोतरा**—पु. एक फुलझाड व त्याचें फूल, बीं. हें विषारी असतें. [सं. धत्तूर] ०घालणें-देणें-(एखाद्यास) धोतऱ्याचें बीं, विष देणें (भ्रमिष्ट होण्यासाठीं, वेड लागण्यासाठीं या वेडातील बडबडणें भविष्यसूचक असतें अशी समजूत आहे) ०येणें-होणें-धोतऱ्याचे विषामुळें बडबडणें, भ्रमिष्ट होणें घोतरेल-न. धोतऱ्यापासून काढलेलें तेल. [धोतरा+तेल]
**घोतरा**—वि वेडा; पिसाट, निर्बुद्ध, मूर्ख, अजागळ (माणूस).
**घोतऱ्या**—वि. धोत्र्या पहा
**घोताटी**—स्त्री. (वे) आत्रे उतरण्याचें साधन, आकडी.
**घोताल-ल्या**—वि १ फार खर्चिक; सढळ हाताचा; उदार; दानशूर (चांगल्या व वाईट अर्थी). २ सढळ; भरपूर; अनियंत्रित (खर्च). ३ वचनें देण्यात, गप्पा मारण्यांत अघळपघळ. ४ तोंडाळ, अव्यवस्थित; व्यसनी; वेढूट वृत्तीचा. [धोत]

**घोती**—स्त्री. (काशी) धोतर पहा. [हिं.]
**घोतीपोती**—पु हठयोगसाधनापैकीं एक प्रकार. मुखावाटे पांढरें स्वच्छ फडकें गिळून तें गुदद्वारानें (आंतील भाग स्वच्छ करून) बाहेर काढणें. धुतीपुती पहा.
**घोत्र, घोत्रजोडा-बडव्या**—धोतर इ० पहा. 'निरावलंब काशावरी। धोत्र ध्वजा लावणें।' –सप्र ३.३६. ०पात्र-न. १ वस्त्रें पात्रें (व्यापक रीतीनें). २ धोतरें आणि तसल्या दुसऱ्या वस्तू.
**घोत्रा**—धोतरा पहा.
**घोत्र्या**—पु. १ धोत्रें धुणारा ब्राह्मण; शागीर्द. धोतऱ्या पहा. २ (चोळणा नेसणारे ब्राह्मणेतर ब्राह्मणास निंदेनें म्हणतात) ब्राह्मण, धोतर नेसणारा.
**घोदर**—वि. फुगीर; सुजरा.
**घोदर, घोदरी, घोदरा**—स्त्रीपु फुगवटा; फुगीरपणा; सूज. (क्रि० येणें, चढणें; जाणें; उतरणें, बसणें).
**घोदरणें**—अक्रि. सुजणें, एकदम मोठें होणें; फुगणें.
**घोदराट**—पु. एकदम पुष्कळ आलेली सूज. (क्रि० चढणें; येणें).
**घोंदराट**—पु मोठा धडधडणारा विस्तव; धोंवाळ.
**घोदरी**—स्त्री. (व.) भोंक, छिद्र. या पावसानें तेथें धोंदरी पडली.'
**घोदऱ्या-ल्या**—पु .(राजा व.) फोपशा. 'तो नुसता धोदल्या आहे झालं, त्यांत ताकत बिलकूल नाहीं.'
**घोंदवडा**—पु (महानु) नळकांडें; पिचकारी; धोटी. 'मकरंदाची धोंदवडें। नागवीति समयातें।' –भाए ४३६.
**घोदशी-सी**—स्त्री. (प्रां.) थलथलीतपणा; फुगीरपणा; फोपशेपणा.
**घोदा-धा**—पु उंचावरून पडणारा पाण्याचा लोट, लोंढा; धवधवा; धोत. [ध्व.]
**घोदाट, घोधाट, घोधाटा**—पु १ पाण्याचा लोंढा; घोत २ आगीचा डोंब ३ वाऱ्याचा मोठा झोत; सोसाटा. ४ बंदुका, तोफा इ० काचा धूमधडाका; धाडधाड आवाज. [ध्व धोदा]
**घोदाणा-ना**—पु १ पाणी इ०काचा जोरदार प्रवाह; वेगानें वाहणें (क्रि० लागणें, लावणें) २ मोठ्या आवाजाची पिपाणी.
**घोदारणें**—अक्रि फुगणें, धोदरणें पहा.
**घोधाटणें**—अक्रि. १ अतिशय पिणें; गटगटा ढोसणें. २ तहानेनें व्याकूळ होणें. [ध्व.]
**घोधाणी**—स्त्री. १ (कों.) धवधवा. २ (ल) क्षतादिकांतून चालणारा मोठा रक्तप्रवाह.

**धोधावणें**—अक्रि एकदम खालीं कोलमडून पडणें, आद ळणें [ध्व]

**धोधो**—स्त्री धबधबा, जोराचा पाऊस इ० कांचा आवाज [ध्व]

**धोंधों, धोधो, धोधोधो**—क्रिवि पाण्याच्या प्रवा धाच्या, जोराच्या पावसाच्या, तोफ इ० कांच्या होणाऱ्या आवाजाचें अनुकरण 'धोंधों जे हे लागले येथ वाहों।' –विवि ८३५९ [ध्व स अध अध]

**धोनडा**—वि (प्रां) रड, फोपशा, डमाल्या, थलथलीत, फुगीर, फुगलेला

**धोनडी**—स्त्री. (प्रां) फोंपशेपणा, थलथलीतपणा, फुगीर पणा, धोंपरी

**धोनारणें**—क्रि (महानु) फुरगाळणें 'धोनारिती थोरोट मन्मथचियें।' –भाए ४०७

**धोन्यामेळा**—पु (कु) ख्रिस्त्यांतील एक कुलाचार

**धोप**—स्त्री १ लांब व सरळ तरवार –शिदि १५४ २ वरील तरवारीच्या सपाट अंगानें मारलेला, किंवा दोन्ही हातानीं काठी धरून मारलेला फटका, तडाखा, रपाटा, वार ३ (ल) (झाड इ०चें) फताडें पान, पात 'ह्या केवड्या पानाच्या धोपी ह्या!'

**धोप**—स्त्री (कों) धोपणी पहा

**धोप**—अ पाठरा शब्दास जोडून यणारा अतिशयत्व दर्शक प्रत्यय जसें –पाठरा धोप

**धोप**—स्त्री (वर) उत्साह उमेद 'तुझी धोप तर बघूं या'

**धोप**—वि अस्स शाबूत, मजबूत, (विरू) धडधोप

**धोपट**—न भाकरी; थालीपीठ धुपट पहा समर्थांसी कपटबुद्धीनें आमंत्रण दिधलें। समर्थें सज्जनांचें धोपट करविलें।' –सप्र १८११

**धोपट**—वि धुवट, धुतलेलें (विरू) धुपट पहा

**धोपट**—वि सरळ सोपा, फार इकडेतिकडे वळणावळणाचा (रस्ता). –क्रिवि सरळ, तडक थेट (क्रि० जाणें, बोलणें, पळणें चालणें) [?स अध=खालीं+स पद=पाय=धोपड=धोपट–भाअ १८३५] ०मार्ग–पु १ राजमार्ग, ज्यानें गेलें असता चुकण्याचा संभव नसतो असा सरळ रस्ता, याच्या उलट आडमार्ग आडवाट 'धोपट मारग लागलासे गाढा। मज काय पीडा करा तुम्ही।' –तुगा ९५४ २ (ल) नेहमींची, परंपरागत चालत आलेली रीत, पद्धत शिस्त 'विकट वाट वहिवाट नसावी धोपटमार्गा सोडुं नको।' –अफला ६० 'ब्राह्मणानें धोपट मार्ग सोडून वर्तन करूं नये' –टि १ ३५१ [धोपट+मार्ग] ०मार्गी–वि १ धोपट मार्गानें चालणारा, वागणारा. २ (ल) सरळपणाचें, चोख वर्तन ठेवणारा; छक्केपंजे माहीत नसलेला, स्पष्टवक्ता, निर्भीड [धोपट मार्ग]

**धोपटणें**—सक्रि काठी, दांडा इ०नीं (पदार्थ, मनुष्य इ०कास) बडविणें, मारणें, चोपणें, ठोकणें 'असें मृदु म्हणोनि बा! मज न धोपटा कापुरा।' –केका ८४ [ध्व धप सं अध=खालीं+सं स्फोटनम्–फोडणें=धोपोटणें–धोपटणें –भाअ १८३५]

**धोपटी**—स्त्री १ वस्तर इ० उपकरणें ठेवण्याची न्हाव्याची धाबळ्याची बगलेंत मारता येण्यासारखी पेटी, धोकटी २ पडशी, दुतोंडी पिशवी 'धोपटी जयाची गोणी एवढी। सकळ साहित्य वाटणा मांडी।' –दाशि २३२ [धोकटी, गुज धोकटी]

**धोपटीव**—वि काठीनें, दांड्यानें बडविलेला (कपडा, साल, काथ्या इ०) [धोपटणें]

**धोपणें**—अक्रि १ उन आणि श्रम यांमुळें व्याकुळ होणें; अतिशय तान्हेलें होणें, तृषाक्रांत होणें 'दुःशासनासि बधिनों मी भीम गजासि धोपला हरिसा।' –मोकर्ण ४५८ 'यामुळें तो थकला व उन्हाचा कडाका असल्यानें.. धोपून जाईल' –सुकी ६४ २ (ल) (एखाद्या गोष्टीकरितां) अतिशय उत्कंठित, उत्सुक, आतुर होणें नितांतपणें घुरघुरणें ३ व्याकुळ, दुःखित होणें 'धर्ममयाच्या ताखोंचें धोपले।' –मोरोपंत–सीतागीत–(नवनीत (पृ) २६१) 'वियोगाग्नि मज जाळितसे या वरें धोपलें।'–होला ९४ [स धूप्]

**धोपर**—न गुडघा, ढोपर पहा [ढोपर] ०संध्या–स्त्री गुडघ्यापर्यंत पाय धुणें 'धापर संध्या रे करा। चला जाऊ रे जेवणाला।' –ऐपो ४२ [धोपर+संध्या]

**धोंपळा**—पु (गो) एक सर्पविशेष (गो) भिवण

**धोंपळा**—पु मोठें छिद्र, भगदाड

**धोपा**—पु (ना व) अर्क

**धोपाटी**—स्त्री दोन्ही हातानीं काठी धरून (जनावर इ० नां) जोरानें मारलेला रपाटा, फटका, तडाखा, वार [धोप]

**धोपारधडा**—पु (गो) भरमसाटपणानें, कसेंतरी, अव्य वस्थितपणानें काम करण्याची पद्धत; चालढकल 'सारखें माज धोपारधडा करून काय फायदा' [ढोपर+घडा]

**धोबड**—स्त्री (मालेगावी) म्हैस, डोबड

**धोबड**—वि १ (कों) बोजड आणि जाडाभरडा, (एखाद्या कार्याच्या दृष्टीनें) अयोग्य मोठा असलेला (जिन्नस, लाकूड, वस्त्र) लेखणी धोबड म्हणून अक्षर धोबड येतें' २ ओबड धोबड अडाणीपणाची अकुशल (एखाद्या वस्तूची बनावट, कारागिरी इ०) [का दोप्प–धोप्प=जाडी ?]

धोबी—पु कपडे धुण्याचा धदा करणारा, परीट [ स. धू=धुणें, धौनिक–धौवीअ–धोवीअ–धोबी–भाअ १८३५, हिं धोबी, गुज धोबी ] ॰पछाड–पु (मल्लविद्या) एक डाव (प्रति पक्ष्यास धुण्याच्या वस्त्राप्रमाणें आपटून चीत करणें) प्रतिपक्ष्याच्या बगलेत आपला खांदा देऊन किंवा पाठीवरून त्यास पाडतात असा डाव [ धोबी+पछाड

धोबी—पु (वों) एक पक्षी हा झाडावरील किडे खातो यास बाणपाखरू असेंहि म्हणतात

धोबीण—स्त्री धोब्याची स्त्री, परटीण ,

धोम्या—पु (माण) धोतरवडव्यो, द्वागीनै, धड

धोय—न (कर) दहीं [ दहीं अप ]

धोय—क्रि (काव्य) १ धुई 'भीतर मैला कबमिटोर भर उपर धोय।' –तुगा ४२९ २ धुणें या धातुचें प्रत्यय लावण्यापूर्वीचें रूप 'प्रात काळीं काता वैसे अगधोया।' –रामदासी २ ११०.

धोयटा—पु (माण) एक वनस्पति

धोया—पु (हेट नाविक) खुटीच्या आकारासारखें लाकूड

धोया, धुग्या—वि उघडानागडा, अवधूत 'नागडघोया'

धोरडा—पु (झाडाची साल, वस्त्र इ॰काची) चिरफळी, चिंधी, धांदोटी, चिरोटी (क्रि॰ काढणें, निघणें) ॰काढणें–(ल) (एखाद्यास) नागविणें, लुबाडणें ॰निघणें–(ल) (एखादा) नागवला, लुबाडला जाणें

धोरण—न १ तोंड, दिशा, सधान, नम, रोंख 'मोर च्याचें धोरण किल्यावर आहे' 'मद्दागिरीचें धोरण कोणत्या बदराकडे आहे?' २ केवळ नजरेनें पाहून (एखाद्या गोष्टीच्या) स्वरूपाविषयीं केलेला अदाज, अजमास, तर्क, अटकळ बांधण्याची बुद्धीची चतुरता, खरा तर्क, अनुमानशक्ति 'याच्या बोलण्या चालण्यावरून हा चोर असेल असें माझ्या धोरणात येतें' 'हें शेत चार खडी पिकावें असें आम्हास धोरण दिसतें' ३ (बोल ताना, एखादी गोष्ट करताना करावयाचा) मागचा पुढचा विचार पोंच सावधानरूप अंत करणवृत्ति, सारासार विचार 'पूर्वी बोललों काय आणि आता बोलतों काय हें धोरण त्यास राहात नाहीं' ४ (एखाद्याच्या भाषण वर्तन इ॰कावरून त्याच्या) उद्देशाची अंतस्थ हेतूची तर्कानें कळून येणारी दिशा, रोंख, स्वरूप 'हा चोरण्यात साधुपणा दाखवितो पण त्याचें धोरण निराळें आहे' ५ सावधानतेची नजर दृष्टि लक्ष्य काळजी 'हे गडी काम करिताना त्यांजवरील तर तुमचें धोरण तिकडे असू द्या' ६ (मनाचा, विचाराचा) कल, ओक रोंख. 'त्याचें प्रपचाकडे धोरण' 'त्याच्या अंत करणाचें धोरण कळत नाहीं' ७ (एखा, द्याच्या अंगीं असलेली एखादें काम करण्याची) हातोटी विशिष्ट पद्धत सरणी, शैली 'नाना फडनीसाचें राज्य करण्याचें धोरण दुसऱ्यास यणार नाहीं' 'ही कशाची पतिव्रता, पतिव्रतेचें धोरणच निराळें' ८ धारा, व्यवहार इ॰कातील सप्रदाय, वळण, वहिवाट जसें– दरबारचें धोरण, सभेचें धोरण ९ पूर्वापार चालत आलेली पद्धत, मोड, रीत जसें–लिहिण्याचें–हिशेबाचें धोरण १० –पु मार्ग रस्ता 'कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं। धोरणू पडिला।' –ज्ञा ६ १५४ [ स धूर्=अग्रभाग, किंवा स धारणा, किंवा स धुर्=जाणणें, स धोरण=वाहन ? ] ॰शुद्ध–वि बिनचूक धोरणाचा, धोरणाला धरून असलेला, पद्धतशीर [ धोरण+शुद्ध=बरोबर ]

धोरणी—वि दूरवर विचार करण्याची बुद्धि ज्यास आहे असा, धूर्त, दूरदृष्टि असलेला अनुसंधानी, तर्क बांधण्यात हुषार धोरण पहा [ धोरण ]

धोरणें—सक्रि (कवि) मैथुनद्वारा (स्त्रीस) उपभोगणें, संभोग करणें

धोरवडा—पु (प्रा) धोरण या शब्दाच्या कांहीं अर्थी योजितात

धोरें—न (विप्र) धारें धारें पहा

धोल—पु ढोल

धोलकें—न (गो) ढोलकें लहान ढोल

धोलणें—अक्रि (गो) डुलणें डोलणें पहा

धोलारो—पु (गो) डोलारा पहा

धोलेरा—पु (गुज) अफूचा दोडा बोंड –कृपि ४९८

धोवट—न धुण्याची क्रिया 'करिता वस्त्राचें क्षाळण। स्वच्छपण धोवटीं।' –एभा १९.२६३ –वि १ शुद्ध निर्मळ २ धुवट धुतलेला [ धुवट ]

धोवळार—न चुनेगच्ची घर मंदिर धवळार पहा 'थोर लिया धोवळारा जाताचि गा। दाता भेटला रामु गा।' –दावि ४९९ [ धवळार ]

धो(धों)सा, धौ(धौं)सा–सा—पु १ मोठी नौबत नगारा २ (ल) डंका, गाजावाजा बोभाटा (क्रि॰ गाजविणें, होणें) ३ निशाण, ध्वज ४ (ल) मोठा लौकिक नाव वैभव, गाजा वाजा प्रसिद्धि ५ हल्ला रणकदन 'चोहोंकडून हर ! हर ! म्हणोन घोडे घातले एकच धौसा केला' –भ व १२१ (नवीप्रत) ६ मर्दुमकी, पराक्रम ७ शाचा झेंडा 'या प्रमाणें यश संपादून धौंसा गाजवून जनकोजी शिंदे दक्षिण वाजवीत गाजत चालले' –भाव १२५ [ ध्व हिं धौंसा–नगारा ] ॰लावून–क्रिवि (ल) वाजतगाजत व निशाणें फडकावीत (जाणें येणें इ॰) 'मी कांहीं तुम्हासारखा चोर करीत येणार नाहीं मी गेलों तर धौंसा लावूनच येईन'

